'महाराष्ट्रीय कलोपासक' (पुणें) या संस्थेतर्फे झालेल्या
१९५७ च्या नाट्यस्पर्धेत
१२५ रुपयांचें पहिलें पारितोषिक मिळालेलें आणि
पुण्यांतील नामवंत रसिक नाट्यटीकाकारांनीं एकमुखानें प्रशंसिलेलें
आत्महत्त्येच्या ज्वलंत समस्येवरील अत्यत प्रभावी

नवें सामाजिक नाटक

# मृत्युंजय

: लेखक :

**प्रा. पद्माकर डावरे**

एम्. एससी.

शाळा कॉलेजांच्या स्नेहसमेलनप्रसगीं करावयास अत्यंत योग्य व
अतिशय परिणामकारक असें तीन अंकीं स्वतंत्र सामाजिक नाटक

**मिळण्याचें ठिकाण :**

**जोशी ब्रदर्स बुकसेलर्स ॲण्ड पब्लीशर्स**

आप्पा बळवंत चौक, शनिवार पेठ,
पुणें २

# बदाम राणी-चौकट गुलाम

(तीन बेफाम विनोदी एकांकिका)

: लेखक :

प्रा. पद्माकर डावरे

एम्. एस्सी.

शिरीष एजन्सीज्, मुंबई ४

किंमत एक रुपया आणि पंचवीस नये पैसे

प्रकाशक :
सुरेश राऊत
[ शिरीष एजन्सीज् करितां ]
२५, अवंतिकाबाई गोखले रस्ता,
गिरगांवः मुंबई.



प्रथमावृत्तिः आश्विन १५ शके १८७९



पृष्ठें: ८०

मुखपृष्ठः बाळ ठाकरे

मुद्रक :
वि. श्री. जोगळेकर
संजीवन मुद्रणालय,
६९३/३ बुधवार पेठ,
पुणें २.



आयुष्य हा एक पत्त्यांचा खेळ आहे.
आपल्या हातांत हुकुमाचा '**एक्का**' असला,
किंवा त्याच तोलाचा '**राजा**' जरी असला,
तरीहि आपल्या प्रत्येकाला
आपल्या '**राणी**'चं जन्मभर '**गुलाम**' बनून रहावं लागतं
हे सत्य ज्यांना पटलं आहे
अशा जगांतील सर्व
गूढ आणि विचारवंत पुरुषमंडळींना
हा संग्रह सहानुभूतीपूर्वक अर्पण—

—[ बिचारा ! ] लेखक

तीन विनोदी एकांकिका :

काका मला वांचवा !

पांडव प्रताप

बदाम राणी—चौकट गुलाम



**प्रयोग मूल्य** : प्रत्येक एकांकिकेचे दहा रुपये अगर तीन्ही एकांकिकांचा संयुक्त प्रयोग करावयाचा असल्यास एकंदर पंचवीस रुपये, प्रा. पद्माकर डावरे, एम्.एससी., जी. एस्. कॉलेज, खामगांव ह्या पत्त्यावर पाठवावे. लेखकाचे परवानगी वांचून प्रयोग केल्यास कायदेशीर इलाज केला जाईल.

# आणि हा पहिला पत्ता !

या संग्रहांत प्रकाशित होत असलेल्या एकांकिकांपैकीं 'काका मला वांचवा !' ही 'मोहिनी' (१९५३) दीपावली विशेषांकांत, 'पांडव प्रताप' ही 'आवाज' (१९५५) दीपावली विशेषांकांत व 'बदामराणी—चौकट गुलाम' ('राजाची लेक माझी बा ऽयकू ऽ') ही एकांकिका 'आवाज' (१९५६) दीपावली अंकांत प्रसिद्ध झालेली आहे.

यापैकी 'काका मला वांचवा' व 'पांडव प्रताप' या एकांकिकांची अनुक्रमें हिंदी व गुजराती भाषेंत रुपांतरें झाली असून त्यांचे त्या भाषेंतील प्रयोगहि यशस्वी ठरले आहेत.

या एकांकिका प्रस्तुत संग्रहांत अंतर्भूत करण्यास परवानगी दिल्याबद्दल मी 'आवाज'चे संपादक श्री. मधुकरराव पाटकर व 'मोहिनी'चे संपादक श्री. अनंतराव अंतरकर यांचा आभारी आहे.

अल्पावधींत पण आकर्षक मुखपृष्ठ काढून दिल्याबद्दल श्री. बाळ ठाकरे आणि संजीवन मुद्रणालयाचे श्री. अण्णासाहेब जोगळेकर यांचाहि मी आभारी आहे.

गोविंदराम सेक्सेरिया कॉलेज,
खामगांव.

पद्माकर डावरे

आश्विन शुद्ध पौर्णिमा,
शके १८७९.

★ पृष्ठ १२ वर ' बाईसाहेब, तुम्ही म्हणत असाल तर आम्ही आमच्या पाळ्या बदलतो ' या खरकसिंगाच्या वाक्यानंतर ( खालून सहावी ओळ ) सुमेरसिंगाचें एक वाक्य नजरचुकीनें राहून गेलें आहे. तें असें:

**सुमेर**:- बाईसाहेब तुम्ही आम्हाला नोकरीवरून काढून टाकलंत तर आमचं कसं होईल हो ?

# काका मला वांचवा !

## पात्रें

**राघोबादादा**– पुण्याच्या ' ड ' वॉर्डचे रेशनिंग ऑफिसर

**आनंदीबाई**– राघोबादादांची हट्टी, कजाग आणि कारस्थानी बायको.

**नारायणराव**– हैद्राबादच्या शाळेंतून मॅट्रिकची परीक्षा पास झालेला आणि कॉलेजशिक्षणाकरितां आपल्या काकाकडे (राघोबादादाकडे) येऊन राहिलेला आधुनिक कॉलेजकुमार.

**तुळोजी**– राघोबादादांच्या ऑफिसांतला–परंतु आनंदीबाईच्या खास मर्जीत असलेला (त्यामुळे बराच वेळ ' बाईसाहेबांच्याकडे ' घालविणारा) धूर्त आणि हुषार नोकर.

**सुमेरसिंग**– राघोबादादांच्या घरचा ' हरकाम्या. '

**खरकसिंग**– राघोबादादांचा ड्रायव्हर.

[स्थळ– पुण्याच्या डेक्कन जिमखान्यावरील राघोबादादाच्या राहत्या बंगल्याचा दिवाणखाना. सजावट अत्याधुनिक पद्धतीची. पडदा वर जातो त्यावेळी आनंदीबाई हातांतलें पत्र वाचीत अस्वस्थपणें येरझारा घालीत असते. कांहीं वेळानंतर—]

**आनंदीबाई**– ( स्वतःशीच ) मानाजीरावाचं हें पांचवं पत्र! "काय वाटेल तें कर आणि बगूताईचं लग्न जुळवून दे " अशी पुन्हां एकदां त्यांनीं मोठ्या कळवळयानें विनंती केली आहे. बगूताईचं लग्न! खरंच केवढं अवघड काम सोपवलंय् त्यांनी माझ्यावर! सख्ख्या मावसभावाच्या मुलीबद्दल बोलूं नये, पण रंगानं काळी, डोळयानं तिरळी, तोंडानं तोतरी, नाकानं नकटी अन् पायान लंगडी अशी हा मुलगी पत्करणार तरी कोण ? तिला नारायणाच्या गळयांत अडकवावी म्हणून त्याला मी मुद्दाम हैद्राबादहून इथं आणलं. मुद्दाम त्याची आणि तिची ओळख करून दिली, त्यांना पाहिजे तेवढा एकांतहि दिला, पण दरवेळीं तिला पहातांच नारायण गच्च डोळे मिटून घेतो. या कर्माला आतां काय करावं ? कितीहि सांगितलं तरी तिला तो

'अहो बगूताई'च म्हणतो. एवढंच नव्हे तर एकदां तिला 'माझे आई' असंहि तो म्हणाला होता. या साऱ्या लक्षणांवरून तो कांहीं सहजासहजीं तिच्याशीं लग्न करायला तयार होईल असं वाटत नाहीं. इकडली स्वारी तर या लग्नाचं नांव काढायचा अवकाश, कीं आकाशपाताळ एक करील. काय करावं बरं? काय वाटेल तें करून बगूताईचं लग्न नारायणशीच लावलं पाहिजे! "आजच कांहींतरी सोक्षमोक्ष लावते," असं मी मानाजीरावांना पत्र लिहीलंय् खरं पण हें सारं आजच कसं जुळवून आणायचं? (तुळोजी येतो.) अगदीं वेळेवर आलास तुळोजी. हपीसांतूनच, आलास ना?

तुळोजी— होय बाईसाहेब! साहेबांनींच पाठवलं मला. पण बाईसाहेब आपला चेहरा असा उतरलेला कां? कसली चिंता लागली आहे आपल्याला?

आनंदी— नवीन काय असायचं तुळोजी? नेहमीचीच चिंता. बगूताईच्या लग्नाबद्दल काल पुन्हां मानाजीरावाचं पत्र आलं. तिचं लग्न नारायणरावाशीं कसं लावायचं याचाच विचार करीत होते मी.

तुळोजी— बाईसाहेब, या गोष्टीवर असा कितीहि वेळ विचार केलात तरी त्याचा कांहीं उपयोग होणार आहे कां? अहो विचार करून सुटायला तें काय शब्दकोडं आहे? आजपर्यंत आपल्याला अनेकवेळा सांगितलं—आजहि पुन्हां तेंच सांगतो कीं ही गोष्ट गोडीगुलाबीनं व्हायची नाहीं. अशा बोटचेपेपणानं आपण वागाल तर नारायणराव बगूताईशी लग्न लावायला या जन्मीं तयार होणार नाहीं. बळजोरीखेरीज हा मामला सुटायचा नाहीं बाईसाहेब.

आनंदी— पण ही बळजबरी तरी कशी करायची तुळोजी?

तुळोजी— तें माझ्यावर सोपवून द्या बाईसाहेब! तुम्ही म्हणत असाल तर आजच्या आज हें काम करून दाखवतो. पहा तरी एकदां या तुळोजीची मर्दुमकी! अहो नरसोबाच्या वाडीला केव्हाहि लग्नं लावता येतात हें तर तुम्हाला माहीत आहेच. आपले सुमेरसिंग आणि खरकसिंग यांना मदतीला घेतलं कीं झालं. मुख्य अडचण आहे ती साहेबांची. ती तुम्ही सांभाळून घ्या म्हणजे झालं.

आनंदी— (विचार करून) असं म्हणतोस? ठीक आहे. पाहूं या कसं जमतय् तें! ह्यांचं मी पाहून घेते. अरे हो—पण खरंच, ह्यांनीं अजून गाडी कां नाहीं पाठवली? ते घरून निघाले त्यावेळीं मी त्यांना बजावून सांगितलं

होतं कीं आज संध्याकाळीं चार वाजतां गाडी पाठवून द्या म्हणून. अद्याप पत्ता नाहीं. गेला सबंध महिनाभर मी पहाते आहे. ह्यांनीं कधीं चुकून वेळेवर गाडी पाठवली असेल तर शपथ.

तुळोजी– त्याचं असं आहे बाईसाहेब. आतां आम्ही नोकर माणसांनीं याबाबतींत बोलूं नये–पण कांहीं गोष्टीबद्दल खरोखर बोलल्यावाचून रहावत नाही म्हणून धाडस करतो. पण आपण रागावणार नसाल तर–

आनंदी– छे छे रागावेन कशाला? काय आहे तें सांग तर खरं.

तुळोजी– नाहीं पण नकोच! उगीच लहानतोंडीं मोठा घास घ्या कशाला?

आनंदी– कां? त्यांच्या ऑफिसांतली ती टाईपरायटर पारशी मुलगी आहे तिच्याबद्दल कांही आहे वाटतं?

तुळोजी– ( तोंडांत मारुन घेत ) तोबा ! तोबा ! बाईसाहेब, साहेबांच्याबद्दल असं कांहीं बोललों तर माझी जीभ झडून जाईल. साहेबांच्या हपीसांत एवढया टाईपरायटर अन् फोनोग्राफर मुली आहेत, पण एकीच्याहि बाबतींत साहेबांनीं कधीं नांव ठेवण्याजोगी वागणूक केली असं त्यांच्या शत्रूला देखील म्हणतां येणार नाहीं. मी आपल्याला सांगणार होतो तें वेगळंच. त्यांच्या हपीसांतले त्यांचे मित्र आहेत ना ते–ते रामभाऊ प्रभुणे ?

आनंदी– कोण? ते रामभाऊ ? ज्यांना 'रामशास्त्री' म्हणतात ते?

तुळोजी– अहो कसला शास्त्री अन् कसला मिस्तरी ? फालतू माणूस आहे झालं.

आनंदी– बरं मग त्याचं काय?

तुळोजी– तो नेहमी साहेबांची गाडी घेऊन जातो. त्यानं गाडी मागितली अन् साहेबांनी दिली नाही असं चुकून कधी व्हायचं नाहीं. साहेबांनीं फारच डोक्यावर बसवून ठेवलाय त्याला. आजहि त्यानंच नेली असेल बहुतेक गाडी.

आनंदी– पण कां रे–साहेबांचं अन् त्यांचं एवढं मेतकूट कसं काय जमलं?

तुळोजी– अहो हें मलाहि इतके दिवस माहीत नव्हतं. आमच्या हपीसांतले ते फडणीस कारकूनसाहेब आहेत ना त्यांनीं मला परवांच सांगितलं. बाईसाहेब, या रामभाऊ प्रभुण्याला लोक 'शास्त्रीबुवा' 'शास्त्रीबुवा' म्हणून कां म्हणतात हें माहीत आहे कां आपल्याला ?

आनंदी—हो, त्यांनीं कांहीं पुस्तकं लिहिलीं आहेत म्हणे– पाकशास्त्राबरचीं, असं हेच सांगत होते.

**तुळोजी**–अहो, पाकशास्त्रावरचीं कुठलीं बाईसाहेब ? त्या–त्या ( अड-खळत ) त्या–आपल्या 'त्या' शास्त्रावरचीं हो !

**आनंदी**–'तें' शास्त्र ? हें कोणतं नवीन शास्त्र शोधून काढलयं बाई त्यांनीं ?

**तुळोजी**– ( लाजून ) अहो–आतां म्हणजे आणखी स्पष्ट कसं सांगावं बाईसाहेब ? अहो–म्हणजे तीं कसली तरी घाणेरडी चित्रं अन् फाजील मजकूर असलेली पुस्तकं असतात ना, त्यांच शास्त्र !

**आनंदी**–इश्श ! कांहीतरी चावटपणाचं बोलूं नकोस !

**तुळोजी**–तुमच्या गळ्याशपथ सांगतो बाईसाहेब–हें काडीइतकंहि खोटं नाहीं. पाहिज तर तुम्ही फडणीससाहेबाला विचारा. तुम्हाला माहीत नाहीं बाईसाहेब-अहो, या रामशास्त्री प्रभुण्याला हपीसांतले सारे लोक का-का– ( पुन्हां अडखळतो ) 'कामशास्त्री प्रभुणे' म्हणतात !

**आनंदी**–बस्स झाला तुझा चरबटपणा ! ( स्वगत ) अरसं ! असं आहे काय ? तरी म्हटलं आजकाल इकडल्या पिकल्या पानांत एवढा हिरवटपणा कसा यायला लागलाय् ? (उघड) तुळोजी, मला शास्त्रीबुवांचा कांहींतरी बंदोबस्त केलाच पाहिजे. बरं तें राहूं दे. तूं आधीं बाहेर जाऊन सुमेर-सिंगाला पाठवून दे. बंगल्याच्या आसपास कुठेतरी बिड्या फुकीत बसला असेल तो. ( तुळोजी जाऊं लागतो ) अन् हें बघ तूंहि बाहेरच थांब हं. परत हपीसांत जाऊं नकोस. जरूर पडल्यास ताबडतोब बोलावते मी तुला!

[ तुळोजी 'बरं बाईसाहेब' असं म्हणून जातो. थोड्याच वेळांत सुमेरसिंग प्रवेश करतो.]

**सुमेरसिंग**–(घाईघाईनें प्रवेश करीत) मला बोलवलंत बाईसाहेब ?

**आनंदी**– ( रागानें ) कायरे, कुठें गेला होतास इतका वेळ ?

**सुमेर**–कोण? मी? मी तर इथेंच आहे बाईसाहेब मघापासून.

**आनंदी**–मग मला कसा दिसला नाहीस रे ?

**सुमेर**–आतां तें हो मला काय माहीत ?

**आनंदी**–बरं पण काय रे, आज साहेबांना ऑफिसमधून यायला एवढा वेळ कां लागला आहे रे ? कांहीं सांगितलं होतं कां त्यांनीं तुझ्याजवळ ?

सुमेर--अरे हो--तुम्हाला सांगायला विसरलोच बाईसाहेब ! शनिवार-वाडयासमोर कसली तरी सभा आहे. तिकडं गेलेयत् त. घरीं यायला उशीर होईल म्हणून सांगायला सांगितलं होतं त्यांनीं.

आनंदी -मग हें आत्ता सांगतो आहेस होय ? मोठा शहाणाच दिसतो आहस तू!

सुमेर--( विनयान ) कसचं ! कसचं—बाईसाहेब! आपला थोडा फार आहे झाल कामापुरता.

आनंदी--जसा तू तसाच तो खरकसिंग ! कुठे गेलाय रे तो ? चार वाजतां त्याला यायला सांगितल होतं. आता पांच वाजायला आले. हे मेले ड्रायव्हर कधी वेळेवर येतील तर शपथ.

सुमेर--अहो पण बाईसाहेब, तो तर मघाशीच आलाय.

आनंदी--मघाशीच आलाय? मग करतोय काय तो इतका वेळ?

सुमेर--म्हणजे ? अजून तुम्हाला भेटलाच नाहीं तो?

आनंदी-- नाहीं ना!

सुमेर-- काय बदमाष आहे लेकाचा! इथे तुम्ही वाट पहात आहांत अन् तिकडे खुशाल लेकाचा --( एकदम अडखळतो )

आनंदी-- काय रे बोलना! काय करतोय तो?-अन् आहे तरी कुठें तो?

सुमेर-- (चांचरत) अं-अऽ-खरं सांगू कां बाईसाहेब! पण तुम्ही त्याला माझं नांव सांगू नका ह. ती-ती—आपली चंद्राबाई स्वयंपाकीण आहे ना, तिच्याशी गुलगुल गोष्टी करीत बसलाय् तो मागच्या दारीं. पण तुम्ही-त्याला माझं नांव--

आनंदी--अरे मेल्या खरक्या! हे धंदे सुरू केलेस काय? थांब म्हणावं, आता यांना घरीं तर येऊं दे, म्हणजे चांगली खरड काढते म्हणावं तुझी. सुमेरसिंग जा, आधीं बोलावून आण त्याला! अस्सेल तसा फरफटत घेऊन ये! जा लवकर.

[ सुमेरसिंग ' जी बाईसाहेब ' म्हणून जातो आणि थोड्याच वेळांत खरकसिंगाच्या दंडाला धरून त्याला घेऊन येतो. ]

आनंदी-- ( खरकसिंगाला ) काय रे आचरटा, काय गुलगुल गोष्टी चालल्या होत्या रे त्या चंद्राबाईजवळ ?

सरक– ( घाबरुन ) क–कुठं काय? कांहीं नाहीं बाईसाहेब, मी हिनई तिला ' रविवारचा नवा पदार्थ ' समजावून सांगत होतों!

आनंदी– अस्सं होय? एक तासभर तुमचा रविवारचा नवा पदार्थ चालल होता काय? अरे, तुझ्या जिवाला कांहीं लाज ? चार वाजतां तुला गाडी घेऊन यायला सांगितलं होतं ना?

सरक– हो पण बाईसाहेब—

आनंदी– चूप! एक शद्ब बोलूं नकोस जास्तो. बरं झालं, मला सुमेर-सिगानं सांगितलं, नाहीं तर मला कांहीं थांगपत्तादिखील लागला नसता तुमच्या प्रकरणाचा.

सरक– ( सुमेरसिंगाकडे संतापानें पाहून ) अरे चोरा!

सुमेर– (शांतपणें) काय झालं रे बाबा ?

सरक– (रागानें) काय झालं म्हणून वर तोंड करून मलाच विचारतो ? तूं नाहीं वाटतं चंद्राबाईशीं गप्पा मारीत बसत ?

आनंदी– (आश्चर्यानें ) काय? हा पण तिच्याशीं गप्पा मारीत असतो ?

सरक– होय बाईसाहेब, त्यानंच आमच्या पाळ्या ठरवून दिल्या आहेत. यानं सकाळीं बोलत बसायचं आणि मीं संध्याकाळीं. पण मी जरा जास्त वेळ बोलत बसलों कीं याच्या पोटांत दुखायला लागतं आणि—

आनंदी– मेल्यांनो! तरी म्हटलं हल्लीं चंद्राबाईचा दोन्ही वेळचा स्वयंपाक बिघडायला कां लागलाय् ? थांबा जरा, ह्यांना हपीसांतून घरीं तर येऊं द्या तुम्हां दोघांनाहि नोकरीवरून काढूनच टाकायला लावते.

सुमेर– (एकदम् गयावया करून ) नका–नका बाईसाहेब! असं नका करूं पाठीवर पाय द्या पण पोटावर नका देऊं बाईसाहेब!

सरक– बाईसाहेब, तुम्ही म्हणत असाल तर आम्ही आमच्या पाळ्या बदलतो.

सरक–( हलकेंच स्वतःशीच ) आणि चंद्राबाईचं तरी कसं होईल हो ?

आनंदी–नाहीं! नाहीं! नाहीं! त्रिवार नाहीं! मी तुम्हाला माझ्या इथें ठेऊन घ्यायला मुळींच तयार नाहीं.

सुमेर–असं नका करूं बाईसाहेब! तुम्ही काढून टाकलंत तर दुसरं कोण नोकरीवर ठेवणार आहे आम्हाला ?

खरक–आणि नोकरी करायचीच झाली तर ती रेशनिंग हपिसरच्याच घरची करायची असंच आम्ही ठरवलंय् तेव्हां—

सुमेर–तेव्हां आमच्या तोंडचा घांस काढून नका घेऊं बाईसाहेब ! एक वेळ माफ करा. अशी चूक पुन्हां होणार नाहीं.

खरक–आणि झाली तरी आपल्या कानापर्यंत येऊं देणार नाहीं.

सुमेर–(चिडून खरकसिंगला) चूप बैस रे तूं !

आनंदी–(कांहीं वेळ विचार करुन) ठीक आहे. मी तुम्हाला नोकरीवर ठेवायला तयार आहे पण तें एका अटीवर ! तुम्ही माझं एक अत्यंत महत्वाचं गुप्त आणि खाजगी काम केलं पाहिजे.

सुमेर–हो हो–अगदीं एका पायावर ! बोला बाईसाहेब !

आनंदी–पहा बरं! नाहींतर मागाहून नाहीं म्हणाल.

सुमेर–बाईसाहेब, सुमेरसिंग आणि खरकसिंग आपला दिलेला शब्द मागें घेतील असं कालत्रयींहि होणार नाहीं. गंडासिंग लाहोरवाल्याचे पूर्वज–आपलं-वंशज आहोंत आम्ही. (आवेशानं) दिलेल्या शब्दाचं पालन करण्यासाठीं वेळ आली तर आम्ही प्राण देखील देऊं. आजपर्यंत कितीतरी वेळां आम्हीं तसं केलेलं आहे.

आनंदी–शाबास ! मग हरकत नाहीं. (हलक्या आवाजांत) बरं, पण हा नारायणराव घरी तर नाही ना ?

खरक–आपले नारायणराव ना? ते तर गेले आहेत पर्वतीवर फिरायला.

आनंदी– मग हरकत नाहीं. हे पहा, माझं जे काम आहे ना, तें नारायणरावाबद्दलचंच आहे. मी नारायणाला हैद्राबादहून इथें पुण्याला कशाला आणलय्, माहीत आहे तुम्हाला?

सुमेर–हात्तिच्या ! अहो त्यांत काय विशेष ? ते नुकतेच म्याट्रिक झाले आहेत. इथल्या कॉलेजमध्ये त्यांचं नांव घालायसाठीं त्यांना आणलं असेल इथ !

आनंदी–हात् तुझी मुर्खा ! काडीचीदेखील अक्कल नाहीं तुला ! अरे, त्याचं कॉलेजमध्येंच जर नांव घालायचं असतं तर हैदराबादचीं कॉलेजं काय ओस पडली होती ? त्याला कॉलेजमध्यें तर घातलाच आहे, पण त्याचबरोबर त्याचं लग्नहि करून टाकायच ठरवलं आहे मी !

खरक– लग्न का? वाः वाः ! छान !

सुमेर– 'छान' काय लेका ? लग्न नारायणरावाचं आहे ! तुझं नाहीं. पण बाईसाहेब, त्याचं लग्न कुणाशीं ठरवलंय् तुम्ही ?

आनंदी–मानाजीराव देशमुख गांवाचे माझे मावसभाऊ आहेत ना? त्यांच्या मुलीशीं!

सुमेर–असं ! अस ! म्हणजे त्या बगूताईशीं, ती एका डोळयानं तिरळी आणि रंगानं कोळशासारखी गोरीपान आहे तीच ना ?

आनंदी–चूप रे ! असली थोडीशी तिरळी अन काळी म्हणून काय झालं?

खरक–नाहीं, पण मला वाटतं ती थोडसं त–त— तोतरंदेखील ब–ब– बोलते. नाहीं का ?

आनंदी–(रागानं) मग काय झालं बोलत असली म्हणून ?

सुमेर–हो, बाकी तें खरय् म्हणा ! फक्त तिचा एक पाय लंगडा नसता म्हणजे बरं झालं असतं !

खरक–आणि दांत पुढे आले आहेत, त्यांच्याऐवजीं नाक थोडसं पुढं आलं असतं म्हणजे ठीक बेत जमला असता.

आनंदी– गप्प बसा रे ! कशीहि असली तरी माझी भाची आहे ती. आणि नारायण तरी असा काय मोठा मदनाचा पुतळा लागून गेलाय! तेव्हां मी काय सांगतें तें नीट लक्ष देऊन ऐका. तुम्हीं हें लग्न लावून देण्याच्या कामांत मला मदत केली पाहिजे.

खरक– हो हो ! अहो, त्यांत काय आहे ? कुणाचं लग्न लावायच म्हटल कीं मला असं स्फुरण चढत.

सुमेर– आदल्या जन्मीं कोण भटजी होतास कीं काय लेका ! बरं, पण बाईसाहेब, या प्रकाराला साहेबांची संमति आहे ना?

आनंदी– त्यांच्या संमतीशीं तुम्हांला काय करायचंय?

सुमेर– छेः छेः ! बाईसाहेब, साहेबांची संमति असल्याबेरीज आपण या भानगडींत पडणार नाहीं बुवा ! हो, तुमचा होईल खेळ, पण आमचा जीव जायचा ! साहेबांना न विचारतां जर असलं कांहीं केलं तर आम्हाला लाथे· खालीं तुडवून काढतील ते ! तेव्हां काय तें नीट ठरवा.

आनंदी– ( रागानं ) मला वाटलंच तुम्ही अशी माघार घ्याल म्हणून !

सुमेर– नाहीं बाईसाहेब, ही माघार नाहीं. तुम्ही फक्त साहेबांचा होकार मिळवा, मग तुमचं काम एका दिवसाच्या आंत पार नाहीं पडलं तर आमचीं नांवं बदलून टाकूं !

आनंदी– बरं, मी मिळवीन त्यांची संमति. मग तर झालं ?

सुमेर– तशी नुसती तोंडी संमति नको हां बाईसाहेब, त्यांची लेखी संमति हवी.

आनंदी– काय ?

सुमेर– कीं ' नारायणरावांचं लग्न मानाजीरावांच्या मुलीशीं लावून देण्यास माझी कांहींएक हरकत नाहीं, ' आणि त्याच्याखालीं ' राघोबा पुणेकर— ' ढ ' वॉर्ड रेशनिंग हपिसर ' अशी त्यांची सहीदेखील पाहिजे.

आनंदी–बरं, बरं. कबूल !

सुमेर– थांबा, अजून संपलं नाहीं ! त्या चिठ्ठीच्याखालीं तुम्ही आपल्या हातानं लिहिलं पाहिजे, कीं ' या कामगिरीबद्दल सुमेरसिंग आणि खरकसिंग यांना दोन महिन्यांचा पगार आगाऊ इनाम म्हणून देण्यांत येईल आणि त्यांना कधींहि नोकरी वरुन काढून टाकण्यांत येणार नाहीं. '

खरक–त्याचप्रमाणें त्यांच्या खाजगी भानगडींत आपण कधींहि पडणार नाहीं, (हलकेच) तसंच चंद्राबाईला पण कांहींहि बोलणार नाहीं.

आनंदी–कबूल ! कबूल! कबूल! मग तरं झालं ? ही चिठ्ठी हातांत पडतांच तुम्ही ताबडतोब एक गोष्ट करायची. नारायणरावाला मोटारींत घालून ताबडतोब नरसोबाच्या वाडीला घेऊन जायचं. बगूताईला आणि घरच्या मंडळींना घेऊन मी स्पेशल मोटारीनें तुमच्या मागोमाग येतेंच. नरसोबाच्या वाडीला कोणत्याहि मुहुर्तावर लग्न लावतां येतं हें तुम्हाला माहीत असेलच बस्स! एवढं काम पार पाडलंत कीं तुम्हीं मागितलेलं इनाम तुम्हाला मिळालंच म्हणून समजा. मग तर झालं ना?

सुमेर–वाः वाः! मग तर अगदीं शंभर टक्के बेत जमला. नाहीं का रे खरकसिंग?

खरक–हात्तिच्या ! एवढंच ना ? अहो, मग तर तो माझ्या हातचा मळ आहे. नारायणरावांना गाडींत घालतांच गाडी अशी कांही भरधांव सोडतों

कीं पाटलाची वाडी जाऊन नरसोबाची वाडी केव्हां आली हें त्यांना कळा-यचं देखील नाहीं !

आनंदी–ठीक, ठरलं तर मग. (एवढ्यांत राघोबाचं खोकणं ऐकूं येतं) अग बाई! इकडली स्वारी आली वाटतं! जा रे तुम्हीं मागल्या दारी जाऊन बसा. मी थोड्या वेळानं बोलावून घेईन तुम्हांला.

[ दरवाज्याकडे पाठ करून रागावल्याचा आविर्भाव करून कोचावर बसते. राघोबा प्रवेश करतात. त्यांच्या अंगावर उत्तमपैकीं वुलनचा सूट आहे. त्यांनीं ' अमेरिकन नॉट ' स्टाइलचा टाय् बांधला आहे. ]

राघोबा– (प्रवेश करून)हॅल्लो आनंदी ! माय चार्मिंग फ्लॉवर ! व्हेरि सॉरी फॉर दि लेट, डिअर ! (खिशांतून गंगावन काढून हातांत धरीत) हें बघ, मी तुझ्यासाठीं काय आणलं आहे पाहिलंस कां ?

आनंदी– ( रागानं ) काय आणलं असेल तें चुलींत घाला, नाहींतर रस्त्यावर फेंकून द्या !

राघोबा– अरे, अरे, अरे ! तुला असं एकदम संतापायला काय झालं ?

आनंदी– कांऽहीं झालं नाहीं ! वेड लागलंय ! काय म्हणणं आहे तुमचं?

राघोबा–अस वांकड्यांत शिरूं नकोस आनंदी, तुला काय् पाहिजे तें स्पष्ट-पणें सांग. अग, कालच तूं नव्हती का म्हणालीस कीं माझा अंबाडा लहान येतो, म्हणून गंगावन आणा. तें ताबडतोब बाजारांत जाऊन घेऊन आलों. आणि एकच नाहीं (वरच्या खिशांतून दुसरें काढीत)तर दोन ! तरीदेखील तुझा राग कायम आहे ! मग आतां काय तुझ्यासाठीं आयता अंबाडा विकत घेऊन येऊं ?

आनंदी– (तुच्छतेनं) उंः ! नुसते गजरे आणि गंगावनं यांनीं खूष व्हायला मी कांहीं पाळण्यांतली पोर नाहीं लागून गेलें ! यापेक्षां तुम्हीं जास्त कांहीं केलं आहे का ?

राघोबा–अग, जास्त काय करूं तें तरी सांग ! मोटार हवी म्हणालीस तर नऊ हजार रुपये खर्च करून नवी कोरी 'ऑस्टीन' गाडी घेऊन दिली!बंगला पाहिजे म्हणालीस तर शनिवारवाड्याजवळचं एवढं मोठं घर विकून टाकलं

आणि इथं डेक्कन जिमखान्याजवळ नवीन बंगला घेतला! घरकामाला गडी पाहिजे म्हणालीस तेव्हां ऑफिसचा चपराशी सुमेरसिंग घरीं पाठवून दिला! खरकसिंगाची ड्रायव्हर म्हणून नेमणूक केली. दोन्ही वेळच्या स्वयंपाकांसाठीं चंद्राबाईला ठेवून घेतलं. आतां काय तुझीं लुगडीं माझ्या हातानं धुतलीं म्हणजे तुझं समाधान होईल?

**आनंदी**– याच गोष्टी आतापर्यन्त लाख वेळा बोलून दाखवल्या असतील तुम्ही !–पण यापेक्षां नवीन कांहीं तुम्ही केलय् कां ?

**राघोबा**– अग पण नवीन काय पाहिजे याची मला कल्पना तर देशील!

**आनंदी**– नको ग बाई ! आपण कांहीं सांगायचं आणि दुसऱ्यानं तें ऐकायचं नाहीं, असं झालं म्हणजे मला फार वाईट वाटतं बाई !

**राघोबा**– अग, पण आजपर्यंत असं कधीं झालय् कां ? तूं आधीं सांग तर खरं–मग मी ऐकलं नाहीं तर मला बोल !

**आनंदी**– पहा बरं, नाहींतर मागाहून ' नाहीं ' म्हणाल !

**राघोबा**– शक्य नाहीं ! एकदां शद्ब दिला कीं दिला ! हं बोल.

**आनंदी**– नाहीं पण आधीं तुम्ही मला वचन दिलं पाहिजे—

**राघोबा**– दिलं वचन ! हं सांग काय आहे तें !

**आनंदी**– (लाडिकपणानं पण थोडं भीत भीत) मी किनई ऽ–नारायणाचं –किनई ऽ – लग्न करायचं ठरवलय् !

**राघोबा**– (दचकून) काय-काय म्हणालीस ?

**आनंदी**– कां ? ' लग्न ' म्हटल्यावर एवढं दचकायला काय झालं ! तुमचंहि लग्न झालय् ना ?

**राघोबा**– अग, म्हणूनच दचकलों ! तुझी–माझी गोष्ट वेगळी आहे आनंदी ! पण नारायण अजून लहान आहे. नुकताच तर मॅट्रिक पास झालाय तो.

**आनंदी**– येवढा अठरा वर्षांचा घोडा झाला तरी अजून लहानच वाटतोय कां तो तुम्हाला ? आतां मात्र शर्थ झाली ! मग त्याला चाळीसावं वर्ष लागल्यावर त्याचं लग्न करणार आहांत ?

**राघोबा**– अग, तसं नव्हे. पण नुकतंच त्याचं कॉलेजांत नांव घातलय्. त्याला निदान बी. ए. तरी होऊ दे कीं.

**आनंदी**–कां ? त्याला बी. ए. च कशाला व्हायला पाहिजे ? बी. ए. झाल्यावरच लग्न करावं असं पुराणांत कुठं सांगितलेलं नाहीं ना?

**राघोबा**–अग वेडे, ज्यावेळीं पुराणं लिहिलीं गेलीं त्यावेळीं 'बी. ए.' हा पदार्थ कशाशीं खातात हें त्या बिचाऱ्या ऋषीमुनींना माहीतहि नव्हतं, हा साधा 'कॉमनसेन्स' चा प्रश्न आहे.

**आनंदी**–अस्सं ! तुम्ही म्हणतां ती 'कामनशेंग' मला नाहीं असंच म्हणायचय ना तुम्हाला ?

**राघोबा**–असं एकदम खरं बोलणं जमत नाहीं ग मला ! मला एवढंच म्हणायचंय कीं नारायणाच्या लग्नाची एवढी घाई कां चालवली आहेस ?

**आनंदी**–तें तुम्हांला कधींच कळायचं नाहीं, स्वतःचं लग्न पंधराव्या वर्षीच झाल होतं हें लक्षात तरी आहे कां ?

**राघोबा**–(स्वगत) नसायला काय झालं ? तें घातवर्ष अन् तो घातवार या जन्मी तरी विसरणं शक्य आहे कां ?

**आनंदी**–नारायणाला हैद्राबादहून इथं आणण्याचं मीच तुम्हाला सुचवलं. तुम्ही 'नको नको'च करीत होता, पण मीच नेट धरला. म्हणून बिचाऱ्याला पुण्यांत राहायला तरी मिळतय्. इथें आल्यापासून प्रकृती तरी किती सुधारलीय त्याची !

**राघोबा**–आतां मात्र त्याची प्रकृती दिवसेंदिवस घसरत जाणार ! पण पण काय ग– त्याचं लग्न कुणाशीं ठरवलंय तें तरी कळूं दे मला !

**आनंदी**–मानाजीराव देशमुख आहेत ना, त्यांच्या बगूताईशीं !

**राघोबा**– (उसळून) काय म्हणालीस ?

**आनंदी**–(ठासून) मानाजीरावांच्या बगूताईशीं ! बोला काय म्हणणं आहे तुमच ?

**राघोबा**–छेः छेः ! काय हें आनंदी ! काळी, तिरळी, बोबडी, लंगडी अशी ती मुलगी नारायणाच्या गळ्यांत बांधून तुला काय मिळणार ?

**आनंदी**–मला कांऽहीं मिळणार नाहीं. नारायणाच्या जन्माचं मात्र

कायमचं कल्याण होईल. तें केल्याचं पुण्य तेवढं मिळेल मला. अहो माना-जीराव आपली सारी इस्टेट, बंगला, जमीनजुमला सारं कांहीं त्याला देतील.

राघोबा–आणि त्याच्या मोबदल्यांत 'तें सोंग' त्याच्या गळयांत बांधून त्याला जन्मठेप भोगायला लावणार असंच कीं नाहीं ?

आनंदी–हो– असंच ! काय म्हणणं आहे ?

राघोबा–अग पण हें सारं ठरविण्यापूर्वी तूं माझा एका शद्बानं तरी सल्ला घेतला होतास कां ?

आनंदी–तुमचा सल्ला काय विचारायचाय्? तुम्ही नाहीं म्हणणार हें मी ओळखलंच होतं.

राघोबा–पण मी नाहीं म्हणतो याचं आणखी एक कारण आहे. अग मी तुझ्या या प्रकरणाआधींच त्या धनाजीराव एकबोटयांना वचन देऊन चुकलों आहे.

आनंदी–(दचकून) काय म्हणालात ?

राघोबा–होय ! मी धनाजीरावांना वचन दिलं आहे कीं नारायण बी. ए. झाल्याबरोबर त्याचं लग्न मी त्यांच्या मुलीबरोबर लावून देईन म्हणून !

आनंदी–(हट्टीपणानें) तें कांहीं नाहीं ! तुम्ही मला वचन दिलं आहे, आतां तुम्हांला माझं म्हणणं ऐकलंच पाहिजे.

राघोबा–(चिडून) आतां मात्र तुझ्या हटवादीपणाची कमाल झाली. दर वेळीं स्वतःचंच घोडं पुढें दामटायची तुझी ही संवय आतां हद्दीबाहेर गेली आहे हं ! आतां माझ्या सहनशीलतेचा अंत पाहूं नकोस–

आनंदी–मला कांहीं माहीत नाहीं ! ही गोष्ट झालीच पाहिजे.

राघोबा– ( निश्चयपूर्वक ) ते कांहीं नाहीं ! मी धनाजीरावांना शद्ब दिला आहे.

आनंदी–आणि मी पण मानाजीरावांना वचन दिलं आहे.

राघोबा– (संतापून) प्राण गेला तरी मी माझा शद्ब मागे घेणार नाहीं.

आनंदी– (तितक्याच जोरानं) जीव गेला तरी मी माझं वचन मोड-णार नाहीं.

राघोबा—(भडकून) तूं आपलाच हेका चालू ठेवलास तर मी डेक्कन-क्वीनच्या पुढं उडी टाकून जीव देईन.

आनंदी— (चिडून) तुम्ही आपलाच हट्ट चालवूं लागलांत तर मी पंजाब-मेलच्या समोर आडवी झोंपून प्राण देईन.

राघोबा— काय वाटेल तें झालं तरी नारायणरावाचं लग्न धनाजीरावांच्या मुलीशींच झालं पाहिजे.

आनंदी— पृथ्वीची उलथापालथ झाली तरी नारायणरावाचं लग्न मानाजीरावांच्या मुलीशींच झालं पाहिजे.

राघोबा (चिडून टेबलावर मूठ आपटीत) मी म्हणतों धनाजीराव ! धनाजीराव ! धनाजीराव !

आनंदी— ( तितक्याच आवेशानं हात आपटीत ) आणि मी म्हणतें मानाजीराव ! मानाजीराव ! ( तिसऱ्यांदा मूठ आपटणार, इतक्यांत तिच्या डोक्यांत एक विचार येतो. एकदम स्वर बदलून) बरं बाई, तुम्ही म्हणतां तसं कां होईना ! पण हें पहा, तसं तुम्ही एका कागदावर तुमच्या सहीनिशी लिहून दिलं पाहिजे !

राघोबा— (आश्चर्यानं) म्हणजे काय ?

आनंदी— कीं ' नारायणाचं लग्न धनाजीरावांच्या मुलीशीं लावायला माझी कांहींहि हरकत नाहीं. '

राघोबा— (मोठमोठ्यानें हंसत) आनंदी ! आतां मात्र तुझ्या पोरकट-पणाची कमाल झाली हं ! अग, या असल्या गोष्टींत लेखी कबुलीजबाब घ्यायची तुझी संवय अद्याप गेली नाहीं अं ? मला आश्चर्य वाटतं तुझं !

आनंदी— त्यांत आश्चर्य कसलं वाटायचंय्, बोडक्याचं ? तुमची स्मरण-शक्ति धड असती तर एवढ्या उठाठेवी कशाला कराव्या लागल्या असत्या मला ! आज धनाजीराव म्हणतां—उद्यां आणखी एखाद्या तानाजीरावाला वचन देऊन बसाल. आतां मानाजीरावांचा रोष ओढवून घेऊन बसलेंच आहें. उद्यां धनाजीरावहि माझ्याच डोक्यावर खापर फोडूं लागतील. तें कांहीं नाहीं. तुम्हीं मला लेखी लिहून दिलंच पाहिजे.

राघोबा:—छट् ! आपण लेखीबिखी कांहीं देणार नाहीं बुवा.

आनंदी–( एकदम रडका सूर काढीत ) हाय रे देवा ! मला वाटलंच तुम्ही असं म्हणाल म्हणून ! आणि मघाशीं काय मारे रंगांत येऊन लाळ घोटणं चाललं होतं. म्हणे, तुझ्यासाठीं हें करीन अन तें करीन. दगड करीन अन् धोंडे करीन. जळ्ला मेला आमचा बायकांचा जन्म ! आम्ही भोळ्या बिचाऱ्या. अम्हाला कुणी कांहीं सांगितलं तरी तें खरं वाटतं. नको गऽ बाई हें जिणं ! अहो चंद्राबाई, आंतून आयोडीनची बाटली आणा होऽ ! तें प्यालें म्हणजे एकदाची सुटेन तरी तुमच्या जाचांतून ! (हुंदके देऊं लागते.)

राघोबा–(कळवळून) अग अग आनंदी ! काय हें ? साध्या गोष्टीचा केवढा विपर्यास करतेस तूं. अग, तूं म्हणत असशील तर साध्या कागदावरच काय, पण स्टँप–पेपरवरदेखील लिहून द्यायची माझी तयारी आहे. त्यांत माझा तोटा कां आहे ? हं, हे घे. (खिशांतून कागद काढून त्यावर लिहूं लागतो.) 'नारायणरावाचं लग्न धनाजीरावांच्या मुलीशीं.......... हरकत नाहीं.' ठीक आहे ?

आनंदी–( रडव्या सुरांत ) त्याच्याखालीं सही केलीत कां ?

राघोबा–हं, ही सही ! आतां तरी झालं ना ?

आनंदी–( एकदम हंसून त्याच्या हातांतली चिठ्ठी हिसकावून घेत ) तुम्ही कित्ती कित्ती चांगले अहांत हो !

राघोबा–बरं बरं, असूं दे. हें बघ, मी माडीवरून कपडे बदलून येतों ! आत्तां आलोंच हं! (जातात.)

आनंदी–(ते गेले आहेत असं पाहून परत येते. चिठ्ठीकडे पाहून) भोळी ग बाई, भोळी इकडली स्वारी ! या 'ध' चा 'मा' मला करतां येईल एवढा साधा विचार सुद्धां त्यांच्या डोक्यांत आला नाहीं. हुंः, म्हणे धनाजीरावांच्या मुलीशीं नारायणाचं लग्न ! शक्य नाहीं तें ! तें मानाजी–रावांच्या मुलीशींच झालं पाहिजे. ( ब्लाऊजला अडकवलेलं पेन काढून ती 'ध' चा 'मा' करते—आणि हांक मारते ) तुळोजी ! सुमेरसिंग ! खरकसिंग !

[ ते तिघेहि धांवत येतात ]

सुमेरसिंग– काय बाईसाहेब-मिळाली चिठ्ठी ?

आनंदी– हं ही घ्या !

तुळोजी– (तिघेजण चिठ्ठी वाचतात ) हां ! हें ठीक झालं ! (स्वगत) त्या नारायणरावाला चहापाण्याला रुपया आठ आणे मागितले, तर बस्सकन् अंगावर आला होता. आतां घे म्हणावं.

आनंदी– मग चला आतां, जलदी करा! शुभकार्याला थोडा देखील उशीर नको. नारायणराव पर्वतीवरुन फिरुन येत असेल, त्याला वाटेंतच गांठा, गाडींत घाला आणि ताबडतोब नरसोबाच्या वाडीला घेऊन चला ! तुळोजी, तूं ताबडतोब एक टॅक्सी घेऊन ये. आपण आत्ताच्या आत्ता हाडपसरला जाऊ अन् बगूताईला न् तिच्या घरच्या मंडळींना घेऊन यांच्या मागोमाग नरसोबाची वाडी गाठूं. अरे नुसते बघत काय राहिलांत शुंभासारखे. धांवा-पळा-लवकर.थोडाजरी उशीर लावलांत तरी सारं मुसळं केरांत जाईल.

[ ते घाईघाईनें जातात. आनंदी आंतून कपडयाचा भारा आणते आणि कॉटखालील लेदरबॅग काढून तिच्यांत भराभर कपडे भरू लागते. एवढयांत आंतून राघोबा प्रवेश करतात. ]

राघोबा– (आश्चर्यानें) हें काय आनंदी ? एवढया गडबडीनें—

आनंदी– ' तूं कुठें निघाली आहेस ' हा प्रश्न मला विचारूं नका. तसं केल्यानं अपशकुन होतो हें माहीत आहे ना तुम्हाला ?

राघोबा– नाहीं, पण—

आनंदी– काय, कुठें, कशाला, कशासाठीं, कुणासाठीं यांपैकीं एकहि प्रश्न विचारूं नका. ते सारे प्रश्न अपशकुनी आहेत ! ( हें बोलत असतां तिचं बॅगमध्यें कपडे भरणं चालूच असतं. कोणता प्रश्न आणि कसा विचारावा हेंच राघोबाला कळत नाहीं. ते घुटमळतात.)

राघोबा–नाहीं पण— म्हणजे— अंऽ नाहीं म्हणजे— तूं– तूं– परत तरी कधीं येणार आहेस ?

आनंदी–परत येईन उद्यां संध्याकाळीं किंवा परवां सकाळीं !

राघोबा-आं ? (भान न राहून) अग, म्हणजे तूं निघाली आहेस तरी कुठं ?

आनंदी–(चिडून हातांतली पातळाची घडी आपटीत ) झालं ! केलात अपशकून ? मी निघालें आहे असणार. याचसाठीं तुम्हांला ?

राघोबा–(नकळतपणें) नाहीं. मला तेवढी घाई नाहीं म्हणा, पण म्हटलं आपलं माहीत असलेलं बरं !

[ एवढ्यांत आंतून ' काका मला वांचवा ', ' काका मला वांचवा अशा नारायणरावाच्या आरोळ्या ऐकूं येतात. तो धांवत येऊन राघोबाचे पाय धरतो ]

नारायणराव–(धापा टाकीत ) काका ! काका ! तुम्ही एवढे निष्ठुर कसे हो झालांत ? माझं एवढ्या लवकर लग्न करून तुम्हांला काय मिळणार आहे काका ? नुकतीच कुठं माझ्या आयुष्याला सुरवात झाली आहे. अजून मी कॉलेजचं फाटकदेखील ओलांडलं नाहीं, अशा वेळीं लग्नाच्या बेडीनं माझे पाय जखडून तुम्ही कोणतं पुण्य साधणार आहांत, काका ?

राघोबा– (शांतपणानं ) नारायण, तें सारं मी तुझ्या काकूवर सोंपवून दिलं आहे. काय तें तिलाच विचार !

नारायण– ( आर्ततेनें ) काका, काका, मला एकदम असं तोडून टाकूं नका. तुम्हाला आठवत असेल काका, माझे बाबा मला हैद्राबादच्या स्टेशनवर पोंचवायला आले होते. त्या वेळीं त्यांनीं माझा हात तुमच्या हातांत देऊन सांगितलं, कीं नारायण तुमचा आहे, त्याचा नीट सांभाळ करा. त्याला पोरीसोरींच्या मागें भटकूं देऊं नका ! तो बी. ए. होईपर्यंत त्याचं ' लव्ह मॅरेज ' होणार नाहीं याची काळजी घ्या ! आठवतं ना तुम्हाला तें सारं ? मग मीं नुकतंच कुठं कॉलेजच्या प्रांगणांत पाऊल टाकलं नाहीं, तोंच तुम्ही तें कायमचं मागं खेचूं पहातां अहांत ? कां असं दगडाचं काळीज केलं आहे तुम्हीं? (आनंदीकडे वळून)काकू,काकू,तूं देखील इतकी निष्ठुर झालीस कां ग? तुला आठवत असेल काकू, माझ्या लहानपणीं तूं हैद्राबादला यायचीस. दर शनिवारीं तूं आणि मी मिळून खैरताबादच्या मारुतीला जात असूं.त्या वेळीं त्या मारुतीरायासमोर आजन्म ब्रम्हचारी रहाण्याची प्रतिज्ञा मीं तुझ्या देखतच केली होती ना ? मग तूं तो इतक्या सहजासहजीं विसरलीस? आणि काकू, मी आजपर्यन्त तुझ्या थोडाथोडका कां उपयोगी पडलों आहें ? आजपर्यंतचीं तुझीं महिला–समाजांतलीं सारीं भाषणं मींच नव्हतीं कां लिहून दिलीं ? भगिनी–मंडळाच्या काव्यगायनाच्या चढाओढीसाठीं तूं नेलेल्या कविता मींच

नव्हत्या कां तुला करून दिल्या? काकू, आजपर्यंत काकांच्या कोटांतून किती-वेळां त्यांना न विचारतां पैसे काढून घेतलेस, पण तें मीं त्यांना एकदां देखील सांगितलं नाहीं! तुझ्या जॉर्जेटच्या साड्यांना मी नेहमीं इस्तरी करून आणीत होतों. तुझ्या मैत्रिणीकडून तूं उसनें आणलेले दागिने वेळच्या वेळीं परत नेऊन देत होतों! एवढंच नव्हे, तर आजपर्यन्त मीं तें कुणालाहि सांगितलं नाहीं! — मग माझ्या या साऱ्या परिश्रमांचं बक्षिस तूं मला अशा रीतीनं देणार? —आणि माझं लग्न ठरवून ठरवलंस, तेंदेखील मी जिला आई-बहिणीसमान मानतों अशा मानाजीरावांच्या बगूताईशीं?

राघोबा–(मोठ्यानें ओरडून) काय म्हणालास?

आनंदी–(एकदम) तुम्ही आधीं आंत जा पाहूं!

राघोबा–मग, पण—

आनंदी–पण नाहीं अन् बिण नाहीं! तुम्हांला तुमची आनंदी हवी असेल तर आधी आत चालते व्हा! नाहींतर– (पर्समधून आयोडीनची बाटली काढून तोंडासमोर धरीत) मी हें विष, हें जहाल आयोडिन पिऊन टाकल्याखेरीज रहाणार नाहीं. बोला, तुम्हांला तुमची पत्नी पाहिजे कीं पुतण्या पाहिजे?

राघोबा– (विव्हलतेनें) नको नको, आनंदी, जातों मी. हाय रे दैवा! (कपाळावर हात मारून निघून जातो)

नारायण– (मोठ्यानें ओरडून) काका, काका, निदान बगूताईशीं तरी माझं लग्न होऊं देऊ नका! काका! मला वांचवा!

आनंदी– सुमेरसिंग- खरकसिंग! तुम्ही याला घेऊन चला. मी साऱ्या मंडळीना घेऊन तुमच्या मागोमाग येतेच!

तुळोजी– (प्रवेश करीत) बाईसाहेब टॅक्सी आणली आहे.

आनंदी– ठीक आहे! आलेच मी. सुमेरसिंग!

[ सुमेरसिंग आणि खरकसिंग नारायणरावाला ओढूं लागतात. तो ओरडतो "काका, मला वांचवा! माझं लग्न होऊं देऊ नका! बगूताई मला आईच्या ठिकाणीं आहे काका!" त्याचं तोंड दाबलं जातं आणि दोघे 'सिंग' त्याला उचलून बाहेर नेतात. त्यांच्या पाठोपाठ आनंदी (हातांत बॅग घेऊन) आणि तुळोजी घाईघाईनें बाहेर जातात. मोटार भर्रदिशीं निघून गेल्याचा आवाज येतो. पडदा पडतो ]

* * *

# पांडव प्रताप

[ स्थळ– पुण्याच्या शनिवार पेठेतील, एका बोळांतल्या एका जुनाट वाड्यांतली एक ऐसपैस खोली. खोलीचं स्वरुप पहाताच तिथं राहणाऱ्या रहिवाश्यांची कल्पना येण्यासारखी आहे. दोन कोपऱ्यांत दोन खाटा, त्यावर विस्कटलेल्या चादरी, पुस्तकं, दाढीचं सामान, वर्तमानपत्रं, परटाकडून आलेले कपड., कळकट उशा, या सर्वांची एकच भाऊगर्दी झालेली आहे. खाटांच्या खालीं दोन मोडक्या लोखंडी ट्रंका पडलेल्या आहेत. खोलीच्या भितीवर सर्वत्र हॉलीवूडच्या नटयांचे पोहण्याच्या पोषांखातील किंवा ' जास्तीत जास्त शरीर उघडें ठेवण्याच्या ' स्पर्धेतील फोटो लावलेले आहेत ! खोलीच्या एका कोपऱ्यांत एक मोडकं टेबल आणि त्या टेबलासमोर निमूटपणानं उभी असलेली तितकीच जुनी व ' पुराण वस्तू संग्रहालयांतून ' पळवून आणल्याप्रमाणें दिसणारी एक खुर्ची —असा एकंदरींत थाट !

—पण ही साधीसुधी खोली नव्हे. हें श्री सांब सदाशिव सहकारी नाटयोत्कर्ष मंडळाचं ऑफिस आणि नाटकाच्या तालमीची जागा आहे. तूर्त मंडळानं ' पांडव प्रताप ' हें नाटक बसवायला घेतलं आहे. त्यांत काम करणाऱ्या पात्रांचा परिचय येणेप्रमाणें —

धर्मराज— (मुरलीधर गंगाधर उर्फ नाना वाटाणे ) श्रीसांबसदाशिव नाटयोत्कर्ष मंडळाचा आद्य संस्थापक, मंडळाच्या सर्व नाटकांचा लेखक, थोडासा दिग्दर्शक, कांहीसा संगीत निर्देशक, बराचसा व्यवस्थापक आणि किंचितसा कवि.

भीम— ( रामनाथ पुरुषोत्तम उर्फ अण्णा दबडघाव ) छाती जेमतेम तीस इंच. भीमाचं काम करतांना छातीवर पांचसहा

धोतराच्या वडया गुंडाळाव्या लागतात. एरवीं त्याच्यांत आणि अर्जुनांत फारसा फरक नाहीं.

अर्जुन–(बबनराव बोदडे) अगदींच मेंगळट पात्र. बोलण्यांत 'न' चा 'ण' आणि 'ण' चा 'न' करण्याची भयंकर खोड.मंडळाण याला कसा काय घेतला असा ' प्रश्ण ' साहजिकच ' कुनालाहि ' पडेल, पन मंडळाचा बराचसा 'फाईणान्स' हाच पुरवतो हीच ' ग्याणबाची ' मेख आहे.वऱ्हाडांतून 'पुन्यास' कॉलेजशिक्षनासाठीं येऊन राहिलेला पन शिक्षनापेक्षा 'णाटकांत ' जास्त लक्ष घालणारा प्रानी !

नकुल–( भैय्या बेद्रे ) सहदेव–(मन्या बारपांडे)–हीं पोरं मात्र बरीचशी चलाख आणि कमालीची इरसाल आहेत. नाटकाच्या तालमीच्यावेळीं केळीं, फुटाणे, खारेदाणे खात राहाणं हा यांचा नेहमीचा उद्योग, त्यामुळें दिग्दर्शक महाशयांची कायमची डोकेदुखी!

शकुनिमामा—(रंगराव अण्णाजी उर्फ मामा खेकडे)पांडवांच्याच वयाचा पण अकलेनं अधिक असलेला पक्का " घस्चोट " पुरुष. मंडळाकरितां ' स्त्रीपात्र ' मिळविण्याची जबाबदारी याच्यावर सोपविली गेली आहे.



पडदा उघडतो त्यावेळीं धर्मराज ( नाना वाटाणे ) – नाईट पायजमा आणि नाईट शर्ट हा याचा पोषाख – अस्वस्थ मनानं येरझाऱ्या घालीत असलेला दिसतो. मधूनच तो दरवाज्याकडे पहातो,मनगटावरच्या घड्याळा–कडे पहातो, एक दोनदां बाहेर जाऊन इकडेतिकडे दूरवर नजर टाकून पुन्हां आंत येतो. त्याच्या चेहऱ्यावरचा संताप अधिकाधिक वाढत जातो. धर्मराजाची अस्वस्थता वाढत असली तरी 'भीम' महाराज कमालीचे शांत आहेत. टी शर्ट–काळो प्यांट–आणि तीहि ' आवारा ' पद्धतीनें वर चढवलेली ही त्यांची वेशभूषा ! केशभूषेबद्दल बोलायलाच नको. ' दिलीपकुमार आणि ' राजकपूर ' हे दोन्हीहि एकाचवेळीं त्यांचे याबाबतीतले आदर्श असल्यामुळें त्याच्या चेहऱ्याचा 'प्रेमनाथ' झालेला आहे. खोलींतल्या उजव्या बाजूच्या कॉटवर बसून, आपल्या पायांतला बूट ( हातांत घेऊन ) त्याला जोरजोरांत पॉलीश करण्याचें काम भीमराज मोठ्या मन:पूर्वक करीत आहेत

तें काम चालू असता 'ठैरजरा ओ जानेवाले–हम मत वाले पॉलीशवाले ! हें गाणें ओरजोरांत रंगात येऊन–म्हणत आहेत. पॉलीश संपवून एका बुटा-कडे मोठ्या समाधानानें पहात धर्मराजाला उद्देशून–]

भीम– काय ! कसं काय झालं आहे ?

धर्मराज– ( आपल्याच तंद्रीत-संतापून ] रबिश् ! रॉटन् ! अॅब्सोल्यूट नॉनन्सेन्स् !

भीम– अॅबसोल्युट नॉन्सेन्स? [ बूट त्याच्या तोंडासमोर नेत ) अरे आर-शासारखं चकचकीत पॉलीश झालंय् ! तुलां यांत तोंड पाहून भांग देखील पाडता येईल.

धर्मराज– (रागानं ) तुझ्या बुटाबद्दल नाहीं बोलत रे बुवा मी ! त्यांत माझंच काय-तुझंहि तोंड दिसेल. मी म्हणतोय तें या बाकीच्या गधड्यांच्या-बद्दल. सकाळीं बरोब्बर आठला प्रॅक्टिसला या म्हणून सर्वांना बजावून सांगि-तलं होतं. आज डबल प्रॅक्टिस घ्यायच ठरवलं होतं आपण.आतां दहा वाजा-यला आले आहेत, पण एका तरी टोणग्याचा पत्ता आहे कां ? सगळी काळजी जणूं मलाच !

भीम– ( शांतपणानं दुसऱ्या बुटावरुन ब्रश फिरवीत ) बरोबरच आहे ! नाटक तूंच लिहिलं आहेस, निर्माता तूंच, दिग्दर्शकहि तूंच तेव्हां—

धर्मराज– (रागानं)–नाटकाचं श्राद्ध करायची वेळ आली तरी मीच पळीपंचपात्रं घेऊन पुढं व्हायला पाहिजे–असंच म्हणायचय् ना तुला ?

भीम– ( नकळतपणें ) छे–छे अरे आम्ही आहोंत ना त्याच्यासाठीं !

धर्मराज– ( भडकून ) काय म्हणालास ?

भीम– नाहीं–म्हणजे मला असं म्हणायचं आहे कीं आम्ही असतांना तशी वेळच कशाला येईल ? अरे आपल्या 'पांडव प्रताप' नाटकाची जाहिरात गांवभर झाली आहे. जो तो विचारतोय कीं नाटक आहे तरी केव्हां ? तुला सांगतो नाना–पहिला प्रयोग 'हाऊस फुल्ल' होणार ! अरे कांहीं कांहीं सिच्युएशनसच्या वेळेला तर ऐसा टाळयांचा कडकडाट होईल कीं बंब् ! अरे नाना, ऐसा बार उडवून देऊं की लोक पहातच रहातील.

धर्मराज– हो ! अशाच रीतीनं जर प्रॅक्टिस चालली तर आपल्यासकट सर्वांचा बार उडून जाईल. या लोकांचा रोजचा हा असा उशीर आणि

द्रौपदीचं काम करायला अजून एकहि मायबहीण तयार होत नाहीं. काय होणार आहे कुणास ठाऊक ?

**भीम**—अरे ऐसे डरो मत नाना ! हिंमत है मर्दा तो औरत दे खुदा ! आल्या गांवांत एकहि 'नग' मिळणार नाहीं असं कधी झालंय् ?

**धर्मराज**—असंच झालंय् ! आजपर्यंन्त पुष्कळजणी येऊन गेल्या. पण इथें येऊन एकदां आपला सारा संच पाहिला कीं त्या, कां बिथरतात कोण जाणे. पुन्हां लेकाच्या तोंड देखील दाखवत नाहींत. आण्णा, आपले चेहरे एवढे वाईट आहेत कां रे ?

**भीम**—( भकास चेहऱ्यानं ) हें तुझ्यामाझ्यापेक्षां त्या मायबहिणींनाच माहीत ! कदाचित त्याचं असं असेल नाना, कीं पांच पांडवांची द्रौपदी व्हायला कुणी तयार होत नसेल.

**धर्मराज**—अरे पण नुसतं नाटकांत व्हायला काय हरकत आहे ?

**भीम**—असं तुला अन् मला वाटतं—त्यांना पटायला हवं ना ! पण मला वाटतं आपला मामा खेकडे त्याच कामाकरतां एवढा वणवण भटकतो आहे त्याच्या तपश्चर्येला यश आल्यावांचून रहाणार नाहीं.

**धर्मराज**—पाहूं या काय होईल तें. आज कुणाला तरी आणल्याशिवाय रहाणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून तो बाहेर पडला आहे खरा. (घड्याळा-कडे पहात ) अरे पण आतां हे बाकीचे टोळभैरव येणार तरी केव्हां आणि आपली प्रॅक्टिस सुरू होणार तरी केव्हां ?

**भीम**—खरं सांगूं कां नाना ? आज शनिवार आहे. आज आहे सका-ळची शाळा. तेव्हां माझा असा अंदाज आहे कीं ही टोळधाड—

[ इतक्यांत बबन बोदडे ( अर्जुन ), भैय्या बेंद्रे ( नकुल ) आणि मन्या बारपांडे ( सहदेव ) एकदम प्रवेश करतात. ]

**भैया बेंद्रे** (नकुल) (एकदम् भीमाला)– कुठें गेली असेल? काय अंदाज आहे रे तुझा ? बोल ना !

**भीम**– (गडबडून ) छे छे !—कुठें काय ? -अंऽ मी आपलं-म्हणजे आपलं कांहींतरी—

**मन्या बारपांडे** (सहदेव)– कां? आतां कां बोबडी वळली ? आतां सांग ना काय सांगायचंय् तें ! काय अंदाज होता रे तुझा? आज सकाळची शाळा–

आतां शाळा सुटायची वेळ झालेली-तेव्हां आम्ही कोपऱ्यावरच्या मुलींच्या शाळेच्या आसपास कुठें तरी घोटाळत राहिलेले असूं असंच म्हणायचंय् ना तुला?

भीम- छे-छे-भलतंच ! असं माझ्या मनांत देखील आलं नाहीं. उलट मी तर असं म्हणणार होतों कीं आतां मुलींची शाळा सुटणार, म्हणून तुम्ही नेमका तो रस्ता टाळूनच इकडे येत असाल.

नकुल- काय पण या बोटावरची थुंकी त्या बोटावर घेतो आहेस लेका ! मला माहीत आहे ना तूं काय म्हणणार होतास तें !

धर्मराज- ( रागानें ) बरं मी असं म्हणतो कीं समजा तो तसंच म्हणणार होता. तुमचं काय म्हणणं आहे त्यावर?

नकुल- म्हणणं काय असायचं ? आम्ही होतो तिथेंच-पण त्या शाळे- भोंवती घुटमळण्याचा आमचा हेतू मात्र वाईट नव्हता. का उदात्त हेतूनं प्रेरित होऊन—

धर्मराज- तोंड धुवून ये. एवढे मोठे शद्व खराब करून टाकशील.

नकुल- खरंच सांगतो नानाराव- आम्ही भलत्या सलत्या हेतूनं तिथं थांबलो नव्हतो. नाहीं कां हो बबनराव?

बबनराव (अर्जुन)- तर काय ? ( भीमाला उद्देशून ) याला काय होतंय तसं म्हनायला ? आपन काय तसलीं चावनट मानसं न्हाईत.

धर्मराज—( नकुलाला ) मग काय हो ? कुठल्या सद्हेतूनं थांबला होता तें तर सांगा.

नकुल-द्रौपदी संशोधन ! आपल्या ' पांडव प्रताप ' मध्यें 'सैरंध्री'चं काम करण्याजोगी कुणी 'पुरंध्री' दिसते कीं काय याची टेहळणी चालली होती आमची. नाहीं कां रे मन्या ?

सहदेव—होय ना ! म्हणून तर इतका वेळ थांबलो.

भीम—मग कांही जमलं कीं नाहीं ?

नकुल-अरे कसचं जमतंय्? एकजात साऱ्या गुडघ्याएवढ्या पोरी! सगळी इथून तिथून खुरटी प्रजा.

सहदेव—अरे, त्यांच्याशीं लग्नं लावायाचीं म्हटलीं तर आपल्याला अक्षरशः गुडघ्याला बाशिंगं बांधावीं लागतील. आणि या म्हणे भारताच्या भावी माता !

नकुल---भारताची पुढली पिढी आफ्रिकेतल्या पिग्मींशी कॉंपिटिशन कर- णार हें नक्की ! अरे मेजॉरिटी फ्रॉक आणि स्कर्टवाल्यांची! एखादी पातळ नेसलेली दिसायची--नाहीं असं नाहीं. पण तेंहि बाहुलीला फडकं गुंडाळल्या- सारखं! ( धर्मराजाला ) नानाराव एखादं नवीन नाटक लिहा--' बालद्रौपदी' त्यांतल्या द्रौपदीच्या कामासाठीं सबंध मुलींची शाळा इथें आणून हजर करतो

धर्मराज---तें, नवीन नाटकाचं नंतर पाहूं. सध्यां जें चाललंय् त्याची प्रॅक्टिस तुम्ही सिरियसली करणार आहांत कीं नाहीं हें आधी सांगा.

सहदेव---म्हणजे काय? अशी शंका कां आली बुवा तुम्हाला ?

धर्मराज---( रागानं ) शंका कां आली ? तुमच्या हातावर जीं घड्याळं आहेत तीं वेळ दाखवण्याकरतां आहेत कीं चुना ठेवण्याकरतां आहेत ? आठला जमायचं ठरवलं होतं आपण ! आतां किती वाजले आहेत ?

नकुल---अंह ! आत्तांशी साडेदहा होताहेत. थोडासा उशीर झाला खरा !

धर्मराज---हा काय थोडासा उशीर आहे ? असाच तुम्हाला रोज जर उशीर होणार असेल तर मला वाटत आपण नाटकाची प्रॅक्टिस बंद करून टाकलेली बरी.

सहदेव---( घाबरून ) छे छे, हें भलतंच काय बोलतां आहांत तुम्ही नानाराव ? असं एकदम डोक्यांत राख नका घालून घेऊ बुवा.

धर्मराज---इथं डोक्यांतल्या विस्तवाची राख व्हायची वेळ आली! तुमची वाट पहायची तरी किती वेळ ?

अर्जुन---उद्यापासून बराबर टाईमशीर येनार आपन. येखाद दिवशीं व्हती राव चूक. यवढं काय मनावर घेताय?

नकुल---नानाराव आजच्या दिवस कसूर माफ. उद्यापासून एकदम 'ॲनासीन टाईम ' के मुताबिक--बराबर आयेंगे !

भीम---हं ! चला--टिवल्याबावल्या बस्स करा आतां. घ्या आपापल्या वह्या ! आणि करा सुरवात !

[ सर्वजण आपापल्या वह्या टेबलावर आणि कॉटच्या सामानांतल्या गर्दीत शोधू लागतात. कांहीवेळ थोडी गडबड उडते. 'अरे ही माझी नाहीं तुझी वही आहे ' असें म्हणून वह्या दिल्या जातात. " ही वही कोणाची? शकुनिमामा ! आरल्या मामा खेकडेची ! तो गेलाय द्रौपदी आणायला.

तो कसचा वेळेवर येतोय ! वही राहूंदे इथेंच !" असे उद्‌गार. भीम गदेचे 'आक्टिंग' करण्यासाठीं कोपऱ्यांतली हॉकी स्टिक हातांत घेतो. अर्जुन 'धनुष्या' साठीं छत्री आणून बाजूला ठेवून देतो, अन् सिगारेट पेटवन ओढूं लागतो. सर्वजण वहृया उघडतात. "अंक पहिला प्रवेश पहिला! —हं करा सुरवात भीमराव!" अधूनमधून वहृयांत पहात ( मध्येंच वही न उघडतां ) भाषणें म्हणण्यास सुरवात होते )

धर्मराज—भीमा, दुर्दैवाचा कळस झाला कीं माणसाची विचारशक्ती देखील काम करेनाशी होते असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. नाहींतर द्यूतांत सर्वस्व हरल्यानंतर आपली प्रियपत्नी द्रौपदी हिला देखील पणाला लावण्याची दुर्बुद्धी मला कां व्हावी ? हरहर ! द्रौपदीच्या विटंबनेचा प्रसंग आठवला कीं अजूनहि काळजाचं पाणी पाणी होऊन जातं.

भीम—तुमच्या काळजाचं पाणी होतं, पण माझ्या काळजाचा भडका उडून जातो दादा. सारं अंग संतापानं फुटून जाऊं लागनं. दादा, मला अजूनहि परवानगी द्या. ( हातांतली 'हॉकी स्टिक' वर करीत ) या गदेनं दु:शासनाच्या शरीराच्या चिंधड्या चिंधड्या उडविल्या नाहींत तर नांवाचा भीमच नव्हे मी !

धर्मराज—शांत हो भीमा—शांत हो ! असा उतावीळपणा करून आपला कार्यभाग साध्य होणार नाहीं. त्याला फार विचारपूर्वक पावलं टाकलीं पाहिजेत.

नकुल—( धर्मराजाला ) नानाराव, Excuse—मी ! पण मला असं वाटतं अजूनहि तुमचं 'टोनिंग' बरोबर येत नाहीं. हें वाक्य कसं गुलगुलीतपणानं आणि नाजुकपणानं म्हणायला पाहिजे. (एका स्थानिक पुढाऱ्याची नक्कल करीत ) बंधुभगिनींनो ! गोव्याचा प्रश्न आपल्याला शांततेनंच सोडवायला पाहिजे; पोर्तुगीजांच्या गोळ्यांना आपण अहिंसात्मक चळवळीनेंच उत्तर द्यायला पाहिजे; नाहींतर निष्कारण रक्तपात होऊन आपल्या नांवाला फार मोठा काळिमा लागेल. समजलांत ना लोकहो ?

( सहदेव एकटाच टाळ्या वाजवतो )

अर्जुन—( त्या दोघांना ) आतां शहाणपणा बस झाला. किती वेळां सांगितलं कीं प्राक्टिसच्या वेळेला मधें मधें बडबडत जाऊं नका म्हणून! —हो पुढें !

**धर्मराज**–पुढें काय ? पुढें तुझंच वाक्य आहे कीं लेका !

**अर्जुन**–अरे हॅा–खरंच कीं ! (घाईघाईनें सिगारेटचा एक झुरका घेऊन स्क्रिप्ट पहांत)–दादा तुम्ही कांहींहि म्हना, पन तुमचं हें थंडपनाचं धोरन आपल्याला बिलकूल पसंत नाहीं. वास्तविक भीमाप्रमानेंच माझेपन बाहु स्फुरन पावताहेत–तुम्ही नुसतं हो म्हना की (बाजूची छत्री उचलून धनुष्या-सारखी धरीत, धनुष्यबानानं साऱ्या कौरवांना छिण्णविछिण्ण करून टाकतो

**धर्मराज**–( थाडकन् कपाळावर हात मारून घेत ) बबनराव एन नाटकाच्यावेळीं तुम्ही या ' धनुष्यबानानं' आम्हाला मात्र छिण्णविछिण्ण करून टाकणार ! अरे भल्या गृहस्था ! जरा शुद्ध बोलायला शीक कीं. रोज डोकं फोडतोय तुझ्यापुढें. पण तुझें आपले पहिले प ढे पंचावन्न !

**अर्जुन**–( रागानें हातांतली वही आपटून दाराकडे जात ) खड्डयांत गेलं लेको तुमचं नाटक ! रोज रोज तेंच ! झाली थोडी बोलन्यांत चूक म्हनून कांहीं यवढं बोलायला नको. बास्स् ! आपल्याला नाहीं णाटकांत काम करायचं. आपन तर आज जानारच ! (दारापाशीं जाऊन चपला घालूं लागतो. एवढयांत नकुल आणि सहदेव जाऊन त्याच्या दंडाला धरतात. )

**नकुल**– असं काय करताय् बबनराव ? एवढं रागवायला काय झालं ? अहो चाललीच आहे गंमत !

**अर्जुन**– ही काय गंमत होय ? रोज रोज बरी गंमत चालतेय तुमची ! मी म्हनतो तुम्हाला जर आमचं हें असलं बोलनं माहित होतं तर तुम्ही आम्हाला णाटकांत काम करायला बोलावलंच कशाला?

**सहदेव**–(त्याला बनविण्याच्या विचारानं) वा वा बबनराव ! अहो भलतंच काय बोलताय ? बोलण्याचं एक सोडून द्या, पण तुमच्यासारखं फर्मास अॅक्टींग करणारा मनुष्य आख्ख्या पुण्यांत सांपडायचा नाहीं. म्हणून तर तुम्हाला एवढ्या आग्रहानं आम्ही बोलावून घेतलं.

**अर्जुन**– हे पहा राजे–उगीच बनवू नका आपल्याला. वऱ्हाडच्या काळ्या मातीत जन्म गेलाय् आमचा ! तुम्हाला पैशापुरती आमची जरूर आहे असं म्हना ना !

**भीम**– वा वा ! हें काय भलतंच बोलणं बरं बबनराव ? म्हणजे आम्हाला काय माणसाची किंमत कळत नाहीं होय ? अहो, पैशाचं काय घेऊन बसलांत, एकदां आपला हा 'पांडव प्रताप'चा खेळ थेटरांत लागूंच द्या नुसता ! खोऱ्यांनीं पैसा ओढूं राव आपण ! आहांत कुठं ? या या असे (त्याच्या दंडाला धरून त्याला पुढें आणतात, त्याची वहीं झटकून त्याच्या हातांत देतात.) हा करा सुरुं ?

**अर्जुन**–(वहींत पाहून) या धनुष्यबानानं साऱ्या कौरवांणा छिण्ण-विछिण्ण करुन टाकतो !

**भीम**– शाब्बास ! हे असंच यायला पाहिजे.

**नकुल**– हेंहि नाटकांतलंच वाक्य आहे वाटतं ?

**भीम**– (चिडून) तूं चूप रे गध्ध्या ! हां बबनराव पुढें !

**अर्जुन**– पन दादा, माझी खात्री आहे कीं तुम्ही कधींहि या गोष्टीला संमति देनार न्हाई.

**धर्मराज**–अर्जुना, तुझ्यादेखील मनांत असा विचार यावा याचं मला नवल वाटतं. अरे तूं तरी जरा शांत डोक्यानं विचार कर.

**भीम**– आतां शांत डोक्यानं विचार करायला डोकं तरी शाबूत आहे कां दादा ? (आवेशानं वहीत न पहातां ) भरसभेंत द्रौपदीनं ज्यावेळीं दुःशासनाचं वस्त्रहरण केलं त्यावेळीं—

**धर्मराज**–( पुन्हां कपाळावर हात मारून घेतो ) —अण्णा ! लेका आतां मात्र शर्थ झाली ! रोज नेमकं याच ठिकाणीं तुझं घोडं अडतय् ! अरे द्रौपदीनं दुःशासनाचं नाहीं, दुःशासनानं द्रौपदीचं वस्त्रहरण केलं होतं. आयुष्यांत कधीं रामायण वाचलं होतंस कीं नाहीं ?

**नकुल**- (धर्मराजाला) नानाराव— Excuse me— पण मला वाटतं हा प्रसंग रामायणांत नसून महाभारतांत आहे.

**धर्मराज**–( चिडून ) महाभारतांत असेल नाहींतर शिवलीलामृतांत असेल. तुला काय करायचंय् लेका!

**नकुल**–नाहीं-मला काय करायचंय म्हणा ! तुम्ही दुःशासनाचंच काय

पण रामाचं आणि रावणाचं–दोघांचंहि एकाचवेळीं वस्त्रहरण केलंत तरी आमच्या वडिलांचं काय जाणार आहे?

धर्मराज–मग गप्प बसा तर!

नकुल-बसलो! (खिशांतून केळं काढून अर्धं सहदेवाला देतो आणि अर्धं आपण तोंडांत कोंबतो. हा प्रकार कुणाच्या लक्षांत येत नाहीं.)

धर्मराज–हूं–पुढें!

भीम–(वाचतो) भरसभेंत दु:शासनानं ज्यावेळीं द्रौपदीचं वस्त्रहरण केलं, त्यावेळीं असं वाटलं कीं हे डोळे फुटून कां गेले नाहींत? तें लाजिरवाणं दृश्य पहाण्याचं दुर्भाग्य नशिबी येण्यापेक्षां या शरीरांतून सारे पंचप्राण बाहेर कां निघून गेले नाहींत?

नकुल–(तोंडांत केळ्याचा बोकणा असल्यामुळें)
मॉझी पण टीच शिटी झॉली डॉडा?

(सगळेजण रागानं त्यांच्याकडे पहातात)

धर्मराज–खा लेको!–खा! केळीं खा, दगड खा, धोंडे खा! खात रहा दिवसभर.

नकुल–(घास एकदम गिळून टाकीत) नानाराव Excuse मी! आज शनिवार आहे. रात्रीचा उपास आहे.मघापासून पोटांत कावळे कोकलताहेत–म्हणूनच (खिशांतून एक केळ काढून) घ्या कीं, तुम्हीं पण घ्या कीं एक!

धर्मराज–(त्याच्या हातांतून हिसकावून घेत) दे फेकून गटारांत. (चटकन् स्वतःच्या खिशांत ठेवून देत) हूं पुढें!

नकुल–माझीपण तीच स्थिती झाली आहे दादा. वाटलं कीं कशाला आपण मनुष्याच्या जन्माला आलो? त्यापेक्षां पशूच्या जन्माला गेलों असतो (एकदम थांबून) नानाराव Excuse मी. पण मला वाटतं या ठिकाणीं पशूच्या ऐवजीं "गाढवाच्या जन्माला" असं म्हटलं तर जास्त 'इफेक्टिव' होईल, नाहीं कां? (आवेशानं) त्या पेक्षां गाढवाच्या जन्माला गेलो असतो तर कितीतरी बरं झालं असतं!

धर्मराज-( संतापानं ट्याला ) भैय्याराव वेंद्रे-तुम्ही खरोखरच व्याच जन्माला गेलां आहांत ! गाढवांत आणि तुमच्यांत मला तरी कांहीं फारसा फरक दिसत नाहीं.

नकुल-( शांतपणानं वहींत पहात ) हेंहि वाक्य घालायचं कां नाटकांत ?

अर्जुन-आता शहाणपणा बस्स झाला ! तुमची अक्कल आतां घोड्यापुढें धांवायला लागली.

भीम-(नकुलाला) भैय्या लेका, प्रॅक्टिसच्या वेळेला थोडातरी 'सिरिय-सपणा' ठेवीत जा.

धर्मराज-(रागानं)आणि तुम्हां सर्वांना पुन्हां एकदां बजावून ठेवतो.नाटक मी लिहिलं आहे. त्यांत जें काय बदल करायचे असतील ते मी करीन. तुम्ही कुणी मला अक्कल शिकवायची जरूर नाहीं. आज पर्यंन्त तेरा नाटकं लिहिली तीं कांहीं उगीच नाही !

सहदेव- (नकुलाला) त्यांतल्या एकूणएक नाटकाचे तीन तेरा वाजले ही गोष्ट वेगळी !

धर्मराज- काय म्हणालास !

सहदेव- छे-छे कुठं काय ? मी याला विचारीत होतो कीं ' तेर नवे अष्टोतेरासे कां अडुसष्टासे !'

धर्मराज- (चिडून) मग काय म्हणाला तो ?

सहदेव- अजून कांही म्हणाला नाहीं तो ! येत्या दोनतीन वर्षांत कांहीं-तरी सांगूं शकेल !

धर्मराज- बस्स करा शहाणपणा. वाचा पुढें.

सहदेव- (वाचीत) दादा, कौरवाशीं द्यूत खेळायला आपण मेलो नसतों तर-

धर्मराज- (चिडून) मेलो नसतो नाहीं, गेलो नसतो तर-असं आहे.

सहदेव- ( शांतपणें ) पण इथें ' मेलों नसतो ' च आहे !

धर्मराज- कोणत्या बेअकली माणसानं लिहिलंय तें ?

सहदेव- ( वही दाखवीत शांतपणानं ) मला वाटतं आपलंच हस्ताक्षर आहे हें !

**धर्मराज**– (रागानं) बरं बरं असूं दे, सुधारून घे, तें !

**सहदेव**– (मोठ्यानें) दादा, कौरवांशीं द्यूत खेळायला आपण गेलो नसतो-तर फार बरं झालं असतं असं वाटू लागलंय मला.

**भीम**– दादा ! हें काय केलंत तुम्ही ? पुरुषासारखे पुरुष म्हणवणारे आपण. भाकड भेंगूबाईसारखे, आपल भेकड भागूबाईसारखे गुडघ्यात मान घालून, हातांतलीं शस्त्रें खालीं टाकून स्वस्थ बसलों, हर, हर, थू: आमच्या जिनगानीवर (थुंका अर्जुनाच्या अंगावर उडतो.)

**अर्जुन**– (थुंका पुशीत-रागानं) च्या-! पुन्हां थुकलात कीं राव आमच्या अंगावर ! जरा समोर पाहून थुकत जा म्हणून शंभर वेळेला सांगितलं असल.

**सहदेव**– समोर पाहून? म्हणजे समोरच्या पेटीवाल्याच्या अंगावर थॉवर-वाथ व्हायचा !

**भीम**– बरं बरं ! कळली तुमची अक्कल ! वाचा पुढें.

**सहदेव**– माझं वाक्य नाहींच मुळी ! अर्जुनाचं आहे.

**अर्जुन**– (वहींत पहात) च्या—! खरंच कीं ! भीमा, आपन मान-साच्या जल्माला आलों ही फार मोठी चूक झाली. मानसाचं कोनतं लक्षन आपल्यांत आहे हेंच मला कळत नाहीं. रनांगनांत प्रानार्पन करन्याची हिंमत बाळगनारे आपन भर सभेंत आपल्या पन्तीची विटंबणा झाली–

**धर्मराज**–अरे बाबा, पन्तीची नाहीं, पत्नीची ! बोललं तर राग येतो तुला ! पण आतां हें किती वेळां घोकून घ्यायचं तुझ्याकडून ?

**अर्जुन**–(निराशेनं) हें वाक्य बदला राव. आपल्याला कांही जमायचं नाही हें वाक्य.

**नकुल**– अहो त्यांत काय आहे ? पत्नीच्या ऐवजीं बायको घाला.

**धर्मराज**– बायको ? विद्वान आहांत ! काय पण शब्द शोधून काढला आहे तुम्ही ? पत्नी आणि बायको यांतला फरक तरी माहीत आहे कां तुम्हांला ?

**नकुल**–(शांतपणानें) नाहीं बुवा, काय फरक आहे ?

**धर्मराज**–( गडबडून) फरक म्हणजे– तसा म्हणजे–अऽ फरक म्हटला तर आहे म्हटला तर नाहीं.

सहदेव– म्हणजे काय बुवा ?

धर्मराज– अरे अकलेच्या कांद्यांनों ! एवढी साधी गोष्ट कळत' नाहीं ? पांच जणांची असते ती पत्नी– आणि एकट्याची असते ती बायको !

नकुल–( उपरोधानं ) आतां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला ! म्हणजे द्रौपदा ही 'नॉर्मल सर्कमस्टन्सेस'मध्यें, पांचीहि पांडवांची पत्नी होती. आणि ज्यावेळी ती एकाच पांडवाकडे असायची त्यावेळीं ती त्याची बायको असायची ! वा, वा, नानाराव ! सारं महाभारत तुम्ही एकाच वाक्यांत माझ्या डोळ्यासमोर उभं केलंत ! खरोखर तुमच्या बुद्धिमत्तेची तारीफ करावी तेवढी–

धर्मराज– आलं लक्षांत ! जास्त पाघळूं नका ! बबनराव घाला तिथें बायको !

अर्जुन– कुठें ?

धर्मराज– त्या वाक्यांत !

अर्जुन– असं, असं (वाचीत) हिंमत बाळगनारे आम्ही भर सभेंत आपल्या बायकोची विटंबणा झाली तरी देखील शांतपनानं सारं पहात बसलो. तिनं आमचे काय गून वळखले असतील? काय किंमत केली असल? आतां ती येईल त्यावेळीं तिच्या समोर तोंड दाखविन्याची देखील मला लाज वाटूं लागली आहे.

नकुल– (वाचीत) कंसांत द्रौपदी प्रवेश करते ! पुण्डलिक वरदे हारी विठ्ठल ! नानाराव, आतां येणार तरी केव्हां तुमची द्रौपदी ? रोज रोज आपलं प्रॅक्टिसचं घोडं या वाक्यापाशीं येऊन अडतय्,

सहदेव– होय ना ! द्रौपदी आल्याखेरीज आपलं घोडं सरकायचं कसं पुढं ?

अर्जुन–अन् आपन तर नाटकाची तारीख पन ' डिक्लेर ' करून टाकली. द्रौपदी आल्याबिगर एका महिण्यांत कसं काय जमायचं राव सगळं ?

धर्मराज–आतां मी काय डोकं फोडून घेऊं त्या द्रौपदीपायीं ? सारी खटपट करून पाहिली पण काम करायला कुणीच तयार होत नाहीं त्याला मी तरी काय करूं ?

नकुल–(सुस्कारा सोडून) हूं! आपलं नशीब आहे झालं ते !

भीम–पण आज शकुनिमामा कुणाला तरी घेऊन येणार आहेत ना ?

सहदेव–कोण ? आपला मामा खेकडे ? मग जगाच्या अंतापर्यंत वाट पहात बसा लोकहो ! मामा म्हणजे नंबर एकचा थापाड्या इसम आहे. तो कसचा आणतोय द्रौपदी ?

नकुल–एखादी द्रौपदी मिळालीच तर स्वतःच तिचं हरण करायला मागेपुढें पहाणार नाहीं लेकाचा !

धर्मराज—मला नाहीं वाटत तसं, आणि आज तर कुणालातरी घेऊन येतोच असं त्यानं अगदीं निश्चितपणानं सांगितलय्.

शकुनी मामा–( प्रवेश करीत ) येतोच म्हणजे काय–अगदीं आलोच आहे.

भीम–( आनंदानें ओरडून ) काय? आलात? द्रौपदीला घेऊन आलात?

अर्जुन–( हर्षानं ) खरं म्हनताय कीं काय राव ?

नकुल–मामा थाप तर नाहीं ही ?

शकुनीमामा–सभ्य गृहस्थ हो ! हा मामा खेकडे भलत्या सलत्या गोष्टींत थापा मारणार नाहीं. एकदां मनावर घेतलं कीं कधींहि मागें हटणार नाहीं आपण.

धर्मराज– अहो पण आहे कुठं ती ?

अर्जुन– जरा आना कीं राव लवकर !

शकुनीमामा– सबूर, सबूर मंडळी ! ती बाहेरच उभी आहे. तिचे वडीलहि आले आहेत बरोबर. बोलावतोच मी त्यांना आंत. (दाराकडे जाऊं लागतो, मध्येच थांबून ] पण हें पहा गड्यानों ! जरा तिच्याशीं सभ्यपणानं वागा हं ! भलते सलते प्रश्न कांहीं विचारूं नका. नाहींतर एवढा भगीरथ प्रयत्न करून हातीं आलेलं सावज पटकन निघून जायचं

सर्वजण– छे ! छे ! भलतंच !

(शकुनी मामा जातात. त्याबरोबर खोली आवरण्याकरितां सर्वांची एकच धांदल उडून जाते. धर्मराज खोलीत लावलेले अर्धनग्न नटयांचे फोटो भराभर उलटे करतो. त्या फोटोंच्या मागील बाजूस असलेले माईबाबा

रामपंचायतन, संततुकाराम, बलभीम, स्वामी शिवानंद वगैरे सोज्वळ फोटो दिसूं लागतात ! कॉटवरचीं पुस्तकं, कपडे, शेव्हिंगसेट, भांडीं, भराभर कॉटखालीं जातात. अर्जुन आणि भीम, दोन कळकट चादरी झटकून लगेच कॉटवर पसरतात. नकुल आणि सहदेव खिशांतून कंगवे काढून टेबलावरच्या फुटक्या आरशांत पाहून एकाचवेळीं घाईघाईनं भांग पाडूं लागतात. आरशात पहाण्याकरितां त्यांच्यामध्यें धक्काबुक्की सुरूं होते. धर्मराज आपला फाटका शर्ट दिसूं नये म्हणून गडबडीनं त्याच्यावर एक मळकटसा कोट चढवितो.ही धांदल चालू असतांनाच शकुनी मामा, कु. सखू गोचिडे आणि तिचे वडील श्री. तात्या गोचिडे प्रवेश करतात.)

शकुनीमामा–( गोचिडयांना ) या, या मंडळी आंत.

(धर्मराजासकट सारे एका ओळींत उभे राहतात आणि दारांत उभ्या असलेल्या कु. गोचिडे यांना नम्रपणानं नमस्कार करतात श्री. गोचिडे व कु. गोचिडे आंत येतात. )

शकुनीमामा–( त्यांना ) बसा ना. बसा ! [ त्यांच्याकडे हात दाखवून पांडवांना ] हे श्री. तात्यासाहेब गोचिडे आणि या कु. गोचिडे

(दोघेहि नमस्कार करतात. )

[ पांडवांच्याकडे हात दाखवीत त्यांचीं नांवें क्रमानें सांगतात ]

" हे मुरलीधर गंगाधर उर्फ नाना वाटाणे; हे रामनाथ पुरुषोत्तम उर्फ अण्णा दबडघाव, हे बबनराव बोदडे, हे गंग्या बेंद्रे आणि हे मन्याभाऊ बारपांडे !

प्रत्येकजण जास्तींत जास्त लाचारीनं प्रतिनमस्कार करतो. ओळख करून देणं संपतांच तात्या मोडक्या खुर्चीवर आणि सखू बाजूच्या कॉटवर बसते.)

तात्या गोचिडे–[ त्या सर्वांच्याकडे पाहून ] छान ! छान ! एक, दोन, तीन, चार, पांच, अगदीं पांच पांडवांसारखी दिसताहेत ही सारी मंडळी ! सुरेख ! [ मामांना बाजूला बोलावून घेत ] पण काय हो खेकडे, यांतला लग्नाचा मुलगा कोणता ?

मामा–(हलकेंच, पण प्रेक्षकांना ऐकूं जाईल या बेतानें त्यांच्या कानांत) अहो तुम्हांला जो पसंत पडेल तो ! तुम्ही नुसतं बोट दाखवायचा अवकाश ! कीं आपण तो नग उचललाच म्हणून समजा. तें माझ्याकडे लागलं. काय समजलात ? (हलकेच टाळी देतात. )

तात्या–असं कां ? ठीक, ठीक ! ( मोठ्यानें, पांडवांना ) हुं ! मंडळी मग होऊं द्या प्रश्न विचारायला सुरवात !

मामा–( तात्यांना ) मी आत्तां जाऊन आलोच हं पांच मिनिटांत. ( जातो. )

सखू–हें हो काय तात्या ! एवढ्या लोकांच्या देखत माझा काय लिलांव मांडायचाय् वाटतं ?

तात्या–( तिला बाजूला घेऊन तिच्या कानांत ) —सखे कारटे ! तुझ्या पाया पडतो–पण यावेळीं तरी जरा तोंड संभाळूनबोल ग ! आतापर्यंत तुला पन्नास ठिकाणीं दाखवली–पण तुझ्या फटकळपणामुळें तूं सगळीकडे विचका करून टाकलास, माझे आई गंगे ! आतां इथें तरी जरा डोकं ताळ्यावर ठेवून बोलशील का ?

सखू– ( रागानं ) बरं बरं !

तात्या– अग, एकदां लग्न झालं कीं मग नवऱ्यावर दिवसभर तोंड टाकीत बसलीस तरी मी कांहीं म्हणणार नाहीं तुला ! पण तें होऊं दे आधीं !

( सखू रागानें आपल्या जागेवर जाऊन बसते. )

तात्या– (मोठ्यानें ) हुं मंडळी विचारा काय विचारायचं असेल तें!

धर्मराज– ( सखूला ) तुमचं नांव काय ?

सखू– सखू !

तात्या– अग, सबंध नांव सांग कीं.

सखू– सखू विश्वंभर गोचिडे.

( सगळ्यांचे चेहरे बघणीय होतात)

तात्या– काय हो ? असा एरंडेल प्याल्यासारखा चेहरा करायला काय झालं ?

नकुल– ( तोंड वाकडं करीत ) नाही ! सखू हें नांव जरा ओशट, गिळ-गिळीत अन् खरकटं असं वाटतं ! आमच्या मोलकरणीचं नांव तेंच आहे.

सहदेव– ( तात्यांना ) कां हो– आम्ही यांचं नांव बदललं तर चालेल का ?

तात्या– वा ! अहो चालेल म्हणजे काय ? बदलावंच लागणार कीं तें नंतर !

नकुल– आम्ही किनई यांचं नांव ‘ मधुबाला ’ ठेवूं !

तात्या– अहो मधुबाला ठेवा नाहींतर 'गीताबाली' ठेवा. माझं काय जायचंय ?

धर्मराज– ( सखूला ) तुमचं शिक्षण कुठपर्यंत झालंय ?

सखू– इंग्रजी दुसरीपर्यंत.

तात्या– तसं म्हणजे इंग्रजी तिसरीपर्यंत गेलीय ती !

भीम– मग पुढं काय झालं ?

तात्या– पुढं काय व्हायचंय ? दिली सोडून शाळा !

धर्मराज– कारण ?

तात्या– कारण हिचं आणि एका मास्तराचं ( एकदम जीभ चावीत ) नाहीं म्हणजे हिचं अन् एका मास्तरचं झालं भांडण ! तेव्हां ही म्हणाली 'मला नाहीं शिकायचं आतां !' नाहीं कां ग सखू ?

( सखू कांहींच बोलत नाहीं. )

तात्या–तिचा स्वभाव जरा किंचित्—आपलं म्हणजे— जरा अगदीं किंचित् तापट आहे.

नकुल– (हलकेंच) दिसतंच आहे तें !

तात्या– काय म्हणालांत ?

नकुल– नाहीं मी म्हटलं-तसं कांहीं याच्या चेहऱ्यावरुन दिसत नाहीं.

( धर्मराज जोरांत चिमटा घेऊन त्याला गप्प बसवतो. )

भीम– तुम्ही कोणकोणते विषय घेतले होते शाळेत ?

सखू– शाळेंत विषय घ्यावे लागत नाहींत ! दिलेलेच असतात ते !

धर्मराज– छान ! तुमचा 'बोल्ड'पणा आपल्याला फार आवडला बुवा !

सखू–मी आपल्याला मत विचारीन त्यावेळीं सांगण्याची तसदी घ्यावी.

तात्या–( जोरानं ) सखू !

धर्मराज–(बळंच हंसून) असूं द्या! असूं द्या! आम्हांला अशाच धीट स्त्रीची आवश्यकता आहे. रंगभूमीचा उद्धार करायला अशाच स्त्रियांनीं पुढं यायला पाहिजे.

तात्या–अहो कसली कपाळाची रंगभूमी घेऊन बसलांत? रोजचं आयुष्य म्हणजे रंगभूमी थोडीच आहे ?

**भीम**– वा, वा ! नाहींतर काय ? कुणी तरी म्हटलंय ना की ऑल दि वर्ल्ड इज् ए स्टेज् !

**तात्या**– इंग्रजीचा अभ्यास बराच दिसतोय तुमचा !

**भीम**– (लाजून) कसचं ! कसचं

**अर्जुन**– (सखूला) तुमाला गानं म्हनता येतं काहो ?

**सखू**– 'गानं' नाहीं पण गाणं मात्र येतं.

**अर्जुन**– मग म्हना की राव एकादं !

**सखू**– (चिडून) 'राव'? डोळे तपासून घ्या तुमचे.

**अर्जुन**– (शरमून) च्या—जरा चुकलंच कीं राव आमचं (जीभ चावतो)

**तात्या**– हरकत नाही. चुकू द्या. अहो असं थोडंफार चुकायचच !

**नकुल**– (सखूला) तुमचा नृत्यकलेचा अभ्यास कितपत आहे ?

**सखू**– मला विचारलत तुम्ही ?

**तात्या**– मग काय मला विचारताहेत ते ?

**सखू**– मला नाच मुळींच आवडत नाहीं. कुणाला नाचतांना पाहिलं कीं माझ्या तळपायाची आग अगदीं मस्तकाला जाते.

**नकुल**– बापरे ! मग तर कठीणच आहे.

**तात्या**– अहो कठीण काय आहे त्यांत ? तुम्ही शिकवलंत तर शिकेल कीं ती.

**सखू**- मी बसलीय शिकायला ! मुळीच नाचणार नाहीं मी !

**तात्या**– (रागानं ) तूं नाही तुझा बाप नाचेल !

**सहदेव**– बापरे ! मेलो मेलो ! अहो तुम्ही तस कांहीं करूं नका!

**भीम**– बरं ! बरं ! असू द्या ! (सखूला) तुम्ही आतांपर्यंत किती नाटकं पाहिली आहेत ?

( सखू तात्यांच्याकडे पहाते )

**तात्या**- (रागानं) अग सांग कीं पुष्कळ पाहिलीं आहेत म्हणून ! रामराज्य, भरतभेट, हरहर महादेव, गणेश महिमा, शंकर पार्वती—

**सखू**– ( त्यांच्याच आवाजांत) यापैकीं एकहि नाटक मी पाहिलं नाहीं आणि हीं सारी सिनेमाचीं नांवं आहेत. मी नाटकं पाहिली नाहींत. कारण तात्यांनीं मला आजपर्यन्त कधीहि नाटकाला जाऊं दिलं नाहीं.

**तात्या**-(रागानं) बरं ! बरं !—नाहीं जाऊं दिलं ! मग त्यांत बिघडलं

कुठें ? (पांडवांना) आणि काय हो? समजा मी म्हणतो नाटक नाहीं पाहिलं--कांहीं अडणार आहे त्याच्यावांचून ?

अर्जुन-- नाहीं ! अडनार काय म्हना ? पन पाहिलेलं बरं असतं ! नाहीं तर एकदम काम करायला जरा अवघड जातं. म्हनून म्हनतो--

तात्या--अहो अवघड काय जायचंय ? तिला कोणतंहि काम सांगाना ! झाडलोट सडासारवणापासून तो अगदीं चैत्रगौर सजवण्यापर्यन्त आऽगदीं कुठल्याहि कामांत माघार म्हणून घ्यावयाची नाहीं.

भीम--अरे वा ! म्हणजे यांना बऱ्याच भूमिका येताहेत असं दिसतंय.

तात्या--वा, वा ! तर काय ! अहो एकदां पत्नीची भूमिका करायचं ठरवलं कीं बाकीच्या गोष्टी ओघाओघानं येतातच !

धर्मराज--छान ! हें शिक्षण घरच्याघरीं आपणच दिलं वाटतं यांना ?

तात्या--छे हो ! मी काय देणार कपाळ ? हिच्या मातोश्रीनंच सारं शिकवलं आहे घरबसल्या !

नकुल--अरे वा ! म्हणजें यांच्या मातोश्रीहि या शास्त्रांत अगदीं तरबेज दिसताहेत.

तात्या--तर काय ! अहो पाकशास्त्रापासून तों अगदीं सगळ्या शास्त्रापर्यन्त तरबेज असलेली तिच्यासारखी बाई तुम्हांला शोधूनहि सांपडायची नाहीं. आमची सखू म्हणजे त्याच खाणीतला हिरा आहे. समजलांत ? आऽगदीं! कोणतंही काम सांगाना तुम्ही तिला ! एका पायावर तयार !

धर्मराज--छान ! [ सखूला ] तुमचं पाठांतर कसं काय आहे हो ?

सखू--कां हो ? पाठांतराचा इथें काय संबंध ?

धर्मराज--वा, पाठांतराखेरीज कसं काय होणार ?

सखू--तुम्हीं काय मला दुधाचा रतीब पाठ करायला लावणार कीं वाण्याचा हिशेब ?

भीम--छे: छे: ! अहो नाटकांतलीं भाषणं नाहीं कां पाठ करावी लागणार?

तात्या--[ आ वासून ] नाटकांतली भाषणं ? अहो म्हणजे काय एखादी नाटक कंपनी काढायचा विचार आहे कीं काय तुमचा ?

नकुल--विचार ? मग सध्यां काढलीय ती काय ' सर्कस ' आहे कीं काय ?

तात्या--म्हणजे ? आमच्या सखूला काय नाटकांत नाचण्याकरतां बोलावलंय् तुम्ही ?

सहदेव–मग तुम्हांला काय वाटलं–त्यांना वधूपरिक्षेकरतां बोलावलय् आम्ही ?

तात्या–[ खुर्चीवरून ताडकन् उठत ] चोरांनों !

धर्मराज–काय हो ! असं एकदम भडकायला काय झालं ?

तात्या–भडकायला काय झालं ? तुमची एकेकांची टाळकीं फोडून टाकलीं नाहींत हें नशीब समजा. लुच्चे ! लफंगे ! ! बदमाष ! !

भीम–अहो पण झालंय काय तें तर–

तात्या–कुठं गेला तो मामा खेंकडे ? लेकाला गोळीसांच्याच ताब्यांत देतो. हलकटानं मला बनवलं ! खुशाल खोटं सांगितलं कीं तुमच्या मुलीला स्थळ गांठून देतो म्हणून. सखे, चल ऊठ. आधीं बाहेर चल. मग घेऊं एकेकाचा समाचार.

सखू–थांबा तात्या ! माझ्या लग्नाचं नक्की झाल्याशिवाय मी मुळींच उठणार नाहीं इथून यांना मुली म्हणजे काय चेष्टा वाटल्या आहेत ?

तात्या– अग पण यांतल्या कुणाशीं लग्न करणार आहेस तूं ?

सखू– ओळीनं एकेकाशीं लग्न लावते–अन् मग दाखवते एकेकाला चांगलाच इंगा ! यांना नाटकं करायला पाहिजेत.लग्न मात्र करायला नको आहे!

शकुनीमामा– [ प्रवेश करीत ) ( तात्यांना उद्देशून ) हूं मग बोला यांतला कोणता पसंत आहे तुम्हांला !

तात्या– बेशरम माणसा !

सारे पांडव–( ओरडून ) अहो काय मामा ? डोकं बिकं फिरलंय कीं काय तुमचं ?

मामा–सभ्य गृहस्थहो ! माझं डोकं अगदीं शाबूत आहे. मित्रहो, आतां आपल्या नाटकाकरतां ' द्रौपदी ' मिळवायची असेल तर हा एकुलता एक उपाय शिल्लक राहिला आहे. बाकीचे सारे उपाय थकले ! तेव्हां आतां बोला, तुमच्या पैकीं कोण हिच्याशीं लग्न करायला तयार आहे ?

( नकुल आणि सहदेव मागच्या मागें पळ काढतात )

मामा– काय हो धर्मराज ?

धर्मराज– (घाबरून) छे ! छे ! अजून चार पांच वर्षं तरी लग्न करतां येणार नाहीं मला.

मामा–कारण ?

धर्मराज- बी. ए. झाल्याशिवाय, लग्न करायचं नाहीं, असं वडिलांनीं बजावून ठेवलंय मला !

मामा-( तात्यांना ) मग या जन्मीं यांची आशा सोडा !

( धर्मराज पळून जातो )

मामा-( भीमास ) तुम्ही हो भीमदेव ?

भीम- ( गयावया करून ) अहो पण-पण माझं अपेंडिसायटिसचं ऑपरेशन व्हायचं आहे ! तेवढं झालं म्हणजे मग-मगच- ( तोहि पळून जातो )

मामा-( अर्जुनाकडे पाहून तात्यांना ) हां तात्या-हें स्थळ मात्र गब्बर आहे ! अस्सल वऱ्हाडी वाण आहे हा. हं काय ' अर्जुणा '-तुमचं काय म्हननं ' आहे ?

[ त्याच्या जवळ जातो ]

अर्जुन-[ घाबरून मागें सरकत ] अहो पन-मी माझं-

मामा-अहो असं घाबरतां काय ?

अर्जुन-नाहीं पन् मी—

मामा-अहो काय वाटेल तो हुंडा घ्या. तिथं हयगय नाहीं. नाहीं का हो तात्या ?

( तात्या होकारार्थी मान डोलावतात )

अर्जुन-अहो पन-पन माझं लग्नं झालंय ! मला दोन मुलं पन आहेत, तिकडे मलकापूरला.

( लॉंग जंप मारून पसार होतो )

तात्या- (एकदम मामांकडे जाऊन त्याचा गळा धरीत) आतां राहता राहिलास तूं चोरा ! काय ग सखे, हा बोकड कसा काय आहे ?

सखू- मला पसंत आहे तात्या !

शकुनी मामा- ( घाबरून घुटके घेत ) अहो पण मी-माझं-म्हणजे-

तात्या– तुझं लग्न झालेलं असलं तरी दुसरं लग्न लावून देईन ! दोन लग्न झालेलीं असली तरी तिसरं लावीन.

शकुनी– अहो पण–मी–प–पाया पडतो तुमच्या !

तात्या– लग्नानंतर पाया पडायला ये जांवई म्हणून! मग चांगला आशि-र्वाद देईन तुला. सखे पकड त्याचा हात !

( सखू पुढें होते )

शकुनी– मेलो ! मेलो !

[ तो आणि पडदा बरोबरच खाली कोसळतो ]

* * *



# बदाम राणी – चौकट गुलाम

## पात्रें

| | | |
|---|---|---|
| मार्तंडराव वाघमारे | .. | गडगडपूर संस्थानचे राजेसाहेब |
| तात्या डिंगरे | .. | ,, ,, खाजगी कारभारी |
| गंगू वाघमारे | .. | राजेसाहेबांची मुलगी |
| मन्या शिंगरे | .. | तात्या डिंगऱ्यांचा भाचा |
| रंगराव दाभाडे | .. | राजेसाहेबांचा नोकर |

[ स्थळ—गडगडपूर संस्थानच्या महाराजांच्या वाड्यांतील दिवाणखाना. सर्वसाधारणपणें जुन्या संस्थानी पद्धतीची सजावट. पहाटेची वेळ. कोंबडा आरवतो कुकूऽचकू. थोड्या वेळानं बिचकत बिचकत मन्या शिंगरे हातांत बॅग घेऊन प्रवेश करतो. ]

**मन्या-** ( इकडेतिकडे पहात ) वारे वा संस्थान ! वाड्याच्या बाहेरच्या दरवाजापासून इथपर्यंत शंख करीत आलों पण एक चिटपाखरूं जागं असेल तर शपथ ! या लोकांची सकाळ, दुपारीं बारा वाजतां सुरू होते कीं काय कुणाला ठाऊक? हा गडगडपूर संस्थानच्या महाराजांचा वाडा आहे कीं एखाद्या खेडेगांवची धर्मशाळा आहे हेंच कळत नाहीं. कुणीहि यावं आणि कुणीहि जावं. सारे दरवाजे सताड उघडे ! छान ! आणि आमचे तात्यासाहेब म्हणे या संस्थानचे मुख्य कारभारी ! काय संस्थानाची कळा झाली आहे तें दिसतंच आहे.स्टेशनपासून इथपर्यन्त तंगड्या तोडीत आलों पण मध्यें एकादा टांगा किंवा गाडी दिसेल तर शपथ! बरं अगदीं मागासलेलं संस्थान म्हणावं तर निदान एकादा रथ तरी दिसावा ! पण छे ! नांव कशाला ? ( रंगराव दाभाडे हातांत झाडू घेऊन प्रवेश करतो)

**रंगराव-** आं ! कोन वो तुमी ? आन् कुठूनशान आलांत ?

**मन्या–** मी मनोहर शिंगरे. या संस्थानचे खाजगी कारभारी तात्या शिंगरे आहेत ना त्यांचा मी भाचा. मुंबईहून आलोय. तात्यांनीं बोलावलं होतं मला!

**रंगराव–** अरेच्या! म्हंजी त्येच व्हय तुमी ? तरी मला वाटलंच ! अवं पन् कवाशीक आलांत तुमी ?

**मन्या–** तुला केव्हां दिसतो आहे डोळ्यासमोर ?

**रंगराव–** आत्तांच तर पायलंय् न्हवं का ?

**मन्या–** त्याच्या आधीं एक तास झाला मला इथं आल्याला ! साऱ्या वाड्याभोंवतीं गरगरा हिंडलों. सगळीकडे हांका मारल्या. शेवटीं सरळ दरवाजानं आंत आलों. अरे, या वाड्यांत माणसं रहातात का भुतं ?

**रंगराव–** मी तर मानुसच हाय. बाकीच्यांचं मला ठावं नाई.

**मन्या–** मग बाकीचीं सगळीं कुठं गेलींत ?

**रंगराव–**सगळीं ? म्हंजी काय पांचपन्नास मानसं हायती व्हय ? इनमीन साडेतीन मानसं हायती इथं ! राजेसायेब, राजेसायेबांची लेक, कारभारी अन् मी !

**मन्या–** आलं लक्षांत ! त्या साडेतीनमधला तूं अर्धा दिसतो आहेस. नांव कायरे तुझं ?

**रंगराव–** रंगराव दाभाडे ! रंग्या म्हणतात मला.

**मन्या–** बरं पण काय रे, कारभारी–म्हणजे आमचे तात्या कुठें आहेत ?

**रंगराव–** आंतच हायती–मी जाऊन बोलावून आनतो त्यांना.

**मन्या–** जा–आणि त्यांना सांग कीं तुमचा मुंबईचा भाचा मन्या शिंगरे आलाय म्हणावं.

**रंगराव–** बरय् (डोकें खाजवीत तिथंच घुटमळतो)

**मन्या–** कायरे-अरे थांबलास कां ?

**रंग्या–** (लाचारीनं) काई नाई–वाईच वाईच—

**मन्या–** अरे काय–वाईच काय–सातारा काय–काय म्हणतो आहेस काय?

**रंग्या–** जी–काईच नाय–वाईच इडीकाडीला येखादी गिन्नी असल तर—

**मन्या–**छान ! संस्थान विलीन झाल्यावर तुमची एवढी दुर्दशा झाली कारे ? अरे, राजेसाहेब तुला विडीकाडी कांहीं पुरवीत नाहीत वाटतं ?

रंग्या– अहो कशाच काय आणि फाटक्यांत पाय ! राजेसायेब बिडीसाठी कशाला खर्च करत्याल ! माझ्याकडूनच बिडी मागून घेत्यात झालं !

मन्या– वा: ! राजेसाहेबांची ही स्थिती तर आमचे तात्या काय करीत असतील कोण जाणं ?

रंग्या–करत्यात काय ? दोघं मिळून आलटून पालटून वढत असतील झालं !

मन्या– नशीब ! घे बाबा, हा घे एक आणा–पण तात्यांना पाठवून दे लवकर !

[ तो जाऊ लागतो एवढ्यांत ' तात्या ' हातांत बादली आणि खराटा घेऊन प्रवेश करतात. ]

तात्या– (आश्चर्यानं) कोण ? मन्या ? अरे तूं केव्हां आलास ?

मन्या– झाला एक तास ! बाहेर थांबलों होतों. आत्तांच आंत आलों. (रंग्या जातो)

तात्या– अरे पण भल्या गृहस्था, तूं येणार म्हणून आधीं कळवलं कां नाहींस ? स्टेशनावर मी नसतों कां आलों धमणी घेऊन ?

मन्या– म्हणजे माझं पत्र मिळालंच नाहीं तुम्हांला ? तरी मला वाटलंच ! अहो, तुमचं पत्र आल्याबरोबर मी लगेच उत्तर टाकल होतं.

तात्या– नक्की आठवत आहे तुला ?

मन्या– अहो, म्हणजे प्रश्न आहे का ? मुद्दाम ' एक्सप्रेस डिलिव्हरीनं पाठवलं होतं

तात्या– एक्सप्रेस डिलीव्हरी ? मग बरोबर आहे. मग तें येत्या पांचसहा महिन्यांत मिळेल केव्हां तरी !

मन्या– म्हणजे काय ?

तात्या– अरे बाबा, आमचं हें संस्थान जरी विलीन झालेलं असलं तरी पोष्टमन पूर्वीचाच आहे. पोष्टखातहि जुनंच आहे. त्याच्या संस्थानी संवयी अजून गेल्या नाहींत. एखाद्याच्या मौंजीचं आमंत्रण त्याच्या लग्नापर्यन्त मिळाल तरी नशीब समजतों आम्ही.

मन्या–तें राहूं द्या ! पण तात्या विलीन झालेल्या संस्थानचे का होईना पण एकेकाळीं तुम्ही खाजगी कारभारी होता ! मग ही बादली आणि हा खराटा–हें काय हो ?

तात्या—( शांतपणानें ) हा सगळा खाजगी कारभार आहे बाबा! सगळ्या खाजगी जागा झाडून काढणं हें काम आलं आहे सध्यां माझ्याकडे!

मन्या—अहो, पण हें शोभतं कां तुम्हाला तात्या?

तात्या—आतां सगळं शोभत बरं! हें श्रमदान, हें स्वावलंबन हीं सगळीं तुमचीं फ्याडं तुम्ही आमच्याकडं पाठवून दिलीं. आतां त्यांच्यापुढें मान तुकवण्याखेरीज काय गत्यंतर आहे? सुरुवातीला थोडंसं वाईट वाटलं. पण आतां संवयीनं त्याचं कांहींच वाटेनासं झालं आहे. नाहींतरी हीं सारीं कामं करायला नोकर मनुष्य परवडतो आहे कुणाला इथें? हा रंग्या इथला एकुलता एक नोकर. पण त्याचाहि कांहीं पूर्वीसारखा उपयोग होत नाहीं आम्हांला! उलट तापच झालाय्.

मन्या—कां बरं?

तात्या—कुठल्यातरी कामगार युनियनचा सभासद झालाय ना तो! आतां उठताबसतां युनियनच्या नियमांचा तांबडा कागद दाखवतो तो आम्हांला.

मन्या—छान! आतां युनियन फक्त स्वयंपाकघरातच शिरायची काय ती बाकी राहिलीय—

तात्या— बाकी राहिलीय? भ्रम आहे महाराज आपला. तिथपर्यंन्त देखील जाऊन धडक मारलीय तिनं. आम्ही आमच्याकडे स्वयंपाकाला एक बाई ठेवली होती.ती होती 'अखिल भारतीय स्वयंपाकीण आणि वाढपी संघा'च्या इथल्या शाखेची अध्यक्ष! महिनाभर कांहीं ती टिकली नाहीं—आम्हीच काढून टाकलं तिला.

मन्या— कांहो? काय झालं?

तात्या— अरे, स्वयंपाकापेक्षां इतर उचापतींतच तिचं अधिक लक्ष! घरच्या पोळ्यांपेक्षां गांवच्या चोळ्यांचीच तिला अधिक फिकीर! भाकरी करण्याच्या नांवान शंख! शंख करण्याच्या बाबतींत मात्र तिचा हात किंवा तोंड कुणीहि धरूं शकलं नसतं. मिटिंगा भरवायची—ठराव करायची भाषणं द्यायची! सांगायचा मुद्दा एवढाच कीं एक स्वयंपाक सोडला तर बाकीच्या साऱ्या भानगडी तिला आऽगदीं व्यवस्थित जमायच्या!

मन्या—छान! चांगली अन्नपूर्णा भेटली होती तुम्हाला!

तात्या—ही सारी तुम्हां लोकांची कृपा ! विलीन व्हायच्या आधीं या गोष्टी आमच्याकडे औषधाला देखील सांपडल्या नसत्या. पण आतां काय साराच बट्टयाबोळ होऊन बसलाय !

मन्या—तें असो, पण तात्या तुम्हीं अगदीं एवढ्या गडबडीनं मला कशाला बोलावून घेतलंत ? तुमच्या पत्रावरून कांहींच अर्थबोध होईना मला !

तात्या— हो ! तर तेंच सांगणार होतों मी आत्तां! (बादली आणि खराटा बाजू ा ठेवीत) एका अत्यंत महत्त्वाच्या कामासाठी मी तुला इथं बोलावलंय. तू यदा बी ए. झाला आहेस ना ?

मन्या— (शांतपणानं) होय ! दुर्दैवानं !

तात्या— (आश्चर्यानं) ऑं ! म्हणजे काय ? दुर्दैवानं का म्हणून ?

मन्या— इतके दिवस काळजी नव्हती तात्या—महिन्याच्या महिन्याला आण्णांची मनिऑर्डर यायची. अगदीं सरकारी नोकरी असल्यासारखं वाटत होत. पण बी. ए. झाल्यानंतर आतां मात्र बेकार झाल्याची जाणीव फार तीव्रतेनें वाटूं लागली आहे.

तात्या— मन्या, असा निराश होऊं नकोस. त्याबाबतींतच तुझी कांहींतरी सोय करावी म्हणून मी तुला इथं बोलावलंय.

मन्या— ( हर्षानं ) तात्या ! तुम्हीं मला नोकरी मिळवून देणार आहांत तात्या ?

तात्या— होय.

मन्या— पण कुठें ?

तात्या— इथेंच ?

मन्या— (निराशेनं) इथें ? या गडगडपूर संस्थानांत ? तात्या त्यापेक्षां बेकार राहिलेलं काय वाईट ?

तात्या— मन्या—असं वेड्यासारखं बोलूं नकोस. माणसानं मिळेल त्या ठिकाणीं नोकरी करायला पाहिजे. याबाबतींत मद्रदेशीयांचा आदर्श आपण नेहमीं डोळ्यासमोर ठेवावा. अरे—मदुरेचा लुंगीबहाद्दर मथुरेपर्यंत जाऊन धडकतो कीं नाहीं ? त्रिचनापल्लीचा इडलीसांबार तक्षशीलेपर्यंत जाऊन दरवळतोच कीं नाहीं ? बंगलोरचा ' अय्या ' भोपाळच्या ' भैय्या ' च्या गळ्याला जाऊन मिठी मारतोच कीं नाहीं ? ऑं ! काय रे ? आतां माझंच

पहा ना ! रत्नागिरी जिल्ह्यांतल्या एका बारक्याश्या खेड्यांतला मी–इथें देशावरच्या गडगडपूर संस्थानांत येऊन स्थायिक झालोंच ना ?

मन्या–पण हें संस्थान गडगडलं त्याची वाट काय ?

तात्या–अरे, हें चालायचंच ! अशा गोष्टीमुळें निराश होऊन कुठें भागतंय ? हो–तर काय सांगत होतों मी ? तुला इथंच नोकरी मिळवून देणार आहे ! आतां मी दोनचार वर्षांत पेन्शनींत निघणार तेव्हां माझ्या जागीं–

मन्या–काय तुमच्या जागीं ? छान ! म्हणजे तुमच्या हातांत बादली आणि खराटा आहेच ! आतां माझ्या हातांत फिनाइलचं डबडं देणार बहुतेक तुम्ही !

तात्या–असं वेड्यासारखं बोलूं नकोस मन्या ! अरे वेळ पडली तर कोणतंहि काम करण्याची तयारी ठेवावी–असं तुमच्या त्या गांधींनीं आणि विनोबांनीं सांगितलंय ना ?

मन्या–तात्या, त्यांनीं सांगितलं आहे तें त्यांचं त्यांनाच लखलाभ होवो आपल्याला जमायचं नाहीं तें ! मुंबईत रहाण्यांत जन्म गेलाय् आपला ! इथें राहून असले उद्योग करण्यापेक्षां मुंबईच्या कुठल्याहि थेटरांत डोअरकीपर म्हणून राहणं परवडेल आपल्याला !

तात्या–( चिडून ) वारे महत्त्वाकांक्षा ! मन्या-मन्या–अरे तुम्हीं माणसंच आहांत कां रेल्वेचे रूळ ? अरे जरा डोकं ताळ्यावर ठेवून विचार कर मी ज्या अर्थी तुला तांतडीनं बोलावून घेतलं त्यांत माझा कांहीं चांगलाच हेतू असेलना ? मन्या–अरे तुला नोकरी, बायको आणि घर या तिन्ही गोष्टी एकदमच मिळत असतील तर त्यांत तुझा फायदाच नाहीं का ?

मन्या– म्हणजे ? तात्या, मी नाहीं समजलों. नोकरी ठीक आहे. पण ' बायको आणि घर '-काय भानगड आहे ?

तात्या– हां !-तेंच सांगण्याकरतां मी तुला इथें बोलावलं आहे. आमच्या राजेसाहेबाचा एकुलती एक मुलगी गंगू आतां उपवर झाली आहे. तेव्हां महाराजांनीं मला तिच्याकरतां स्थळ पहायला सांगितलंय् ! मी त्यांना सांगितलं कीं तुम्हीं काळजी करूं नका. अगदीं आपल्या घरचंच स्थळ आहे. तुझ्याबद्दल मी महाराजांच्याजवळ शिफारस करायचं ठरवलं आहे.

मन्या— (तोंड कडवट करीत) नांव काय म्हणालांत ?

तात्या— मार्तण्डराव वाघमारे.

मन्या— अहो, महाराजाचं नव्हे—त्यांच्या मुलीचं !

तात्या— गंगू—गंगू वाघमारे ! काय रे ! तोंड वेडंवाकडं करायला काय झालं ?

मन्या— कांहीं नाही—मातोश्रींची आठवण झाली. त्या गेल्या नसून हयात आहेत असं वाटायला लागलंय्.

तात्या— असं वेड्यासारखं काय बोलतोस मन्या ? अरे, नांवांत काय आहे ? नांव गंगू असलं तरी अगदीच कांही ओबडधोबड प्रकरण नाहीं म्हटलं !

मन्या— हें आमच्यापेक्षां तुम्हांला माहीत ! मुलीचं नांव काय तर म्हणे 'गंगू'—बापाचं नांव 'मार्तंडराव'-आणि आडनांव काय तर म्हणे वाघमारे ! तात्या, तुमच्या गडगडपूरांत नांवाच्याहि बाबतींत अगदीं खडखडाट दिसतोय !

तात्या— मन्या, तुम्हां मुंबईच्या लोकांसारखीं मिळमिळीत अन् पिळपिळीत नांवं कांही इथं सांपडायचीं नाहींत. अन् तसलीं माणसंहि नाहींत इथं. तुमची मुंबईची फ्याशनेबल बया दोन जिने चढून तिसऱ्या जिन्यावर गेली कीं धांपा टाकतां टाकतां अन् टिचभर रुमालानं घाम पुसतां पुसतां बेजार होऊन जाते. तिचा घाम पुसतां पुसतां तिच्या नवऱ्याला घाम फुटतो. पण इथं—! अरे, दोन घागरी दोन्ही कमरेवर आणि दोन हंडे डोक्यावर, एवढ्या भरून घेऊन राजाबाई टॉवर चढून जायला सांगा ना— हाश् कीं हुश व्हायचं नाहीं.

मन्या— तात्या ! मी एखादी सर्कस काढायचं ठरवीन त्यावेळीं तुमच्या या 'प्रकरणा'चा जरूर विचार करीन.

तात्या— त्यावेळीं तूंच का इतरहि अनेक लोक विचार करतील. प्रश्न आजचा आहे आजची वेळ जास्त महत्वाची आहे. मन्या, आतां चेष्टा पुरे ! मी काय सांगतों याचा जरा गंभीरपणानं विचार कर. आमचं संस्थान जरी खालसा झालेलं असलं तरी राजेसाहेबांना एकुलती एक मुलगी—

मन्या– ती कोण गंगाभागीरथी म्हणाला होतां—

तात्या– भागीरथी नव्हे–नुसतीच गंगा! सांगायचा मुद्दा असा कीं तूं जर तिच्याशीं लग्न करायचं कबूल केलंस तर हा सगळा वाडा, थोडीफार शेतीवाडी आणि महाराजांचा खाजगी चिटणीस म्हणून कायम नोकरी! या सगळ्या गोष्टी तुला मिळतील आणि मुंबईतल्या चाळीच्या खुराड्या-पेक्षां इथें राहिलास तर तुझीं बसलेलीं गालफडं तरी वर येतील. बर-गड्यांच्या मधले खड्डे तरी भरून निघतील.

मन्या–हें मुंबईत देखील होऊं शकतं तात्या!

तात्या–भेळ व पाणीपुरी खाऊन? का सोडालेमन आणि कोकाकोला पिऊन? अरे कसले मुंबईचे लोक तुम्ही? पायांत 'बाटा,' डोक्याला 'टाटा' अन् पोटांत 'डालडा'–असल्या कॉस्मॉपॉलिटन पिंडाची माणसं तुम्ही! फुकटचा बडेजाव कशाला मारतोस? मन्या, अरे या साध्या गोष्टी कशा रे तुम्हाला कळत नाहींत? तूं माझं ऐक तर खरं! मी असं म्हणतों, तूं निदान एक वर्षभर तरी इथं राहून पहा. मग कंटाळा आल्यावर लागेल तर पुढल्यावर्षीं मुंबईला जा.

मन्या-तात्या, लग्नाच्या बाबतींतहि हीच सवलत आहे का? तसं असेल तर एक वर्ष काढायची आपली तयारी आहे.

तात्या–मन्या, आतां फाजीलपणा बस्स झाला हं! तूं आतां जास्त वहावत चालला आहेस. हें बघ, तुला केवळ महाराजांचीच इस्टेट मिळेल असं नाहीं तर मीहि इस्टेट द्यायला तयार आहे. नाहींतरी मला आहे कोण तुझ्याशिवाय?

मन्या–तात्या, तुम्ही मला अधिकाधिक पेचांत टाकतां आहांत. पण तुम्ही आतां एवढा आग्रहच करतां आहांत तर त्यांतहि तथ्य असावं असं मलाहि वाटायला लागलं आहे.

तात्या–हां! आतां कसं शहाण्यासारखं बोललास? अरे, बाबा, त्याखेरीज का मी तुला इतक्या तांतडीनं बोलावून घेतलं? आतां मी काय सांगतों तें नीट लक्षांत ठेव. तूं आल्याची वार्ता मी महाराजांना जाऊन सांगतों. कांहीं वेळानं ते स्वतः इथें येतील आणि तुला कांहीं प्रश्न विचारून तुझी चांचणी घेतील.

मन्या–चांचणी ?–म्हणजे परीक्षा ?

तात्या–होय. असा बिचकूं नकोस. महाराजांचा त्याबाबतींत मोठा कटाक्ष आहे. स्वतः परीक्षा घेऊन मगच जांवयाची निवड करायची असं त्यांनीं ठरवलं आहे.

मन्या–झालं ! मग निकाल लागला ! नोकरीकरता आतांपर्यंत झालेल्या दहाबारा इंटरव्ह्यूंत जें झालं तेंच इथं तेराव्यालाहि होणार !

तात्या–घाबरूं नकोस मन्या ! मी आहे तुझ्या पाठीशी. त्यांनी कांहींहि प्रश्न विचारले आणि उत्तर देण्यांत जरी तुझी कांहीं चूक झाली तरी फारसं बिघडणार नाहीं. नंतर मी सांभाळून घेईन.

मन्या–काय म्हणतां, इतकं सोपं आहे तें–

तात्या–अरे, गेलीं अठरा वर्षं गडगडपूरचा कारभार पाहिलाय् मी– तो कांही उगाच नाहीं.

मन्या–पण कां हो तात्या, राजेसाहेब 'वरपरीक्षा' घेतील त्यावेळीं तुम्हीं इथेच कुठेतरी जवळपास असाल ना ?

तात्या–काळजी करूं नकोस. अगदीं तुझ्या जवळच राहीन मी. अधून-मधून तुला खुणा करून मदतहि करीन. राजेसाहेबांना जरा कमी ऐकायला येतं. तेव्हां त्याचा फायदा घेऊन तुला जास्तींतजास्त जेवढं सहाय्य करतां येईल तेवढं मी केल्याखेरीज राहणार नाहीं. मात्र राजेसाहेबांच्या बाबतींत एकच गोष्ट लक्षांत ठेव. त्यांना पूर्वी जी मानमरातबाची संवय होती ती अद्यापहि कायम आहे. आपण खालसा झालेल्या संस्थानचे राजे आहोंत आणि आतां आपल्या राजेपणाला कवडीचीहि किंमत राहिली नाही ही गोष्ट अजूनहि त्यांना पटत नाहीं. तेव्हां त्यांना योग्य तो मान देऊनच त्यांच्याशीं वाग. थोडक्याकरतां त्यांना उगीच नाराज करूं नकोस.

मन्या– बाप रे ! ही तर मोठी आफतच आणली तात्या तुम्ही ! अहो, तुमचे संस्थानचे रीतिरिवाज इथें कुणा लेकाला माहीती आहेत ? ते– 'आस्ते कदम टांगा रखो महारा ऽ ऽ' कां काय म्हणतात तसलं कांहीं आपल्याला जमायच नाहीं बुवा !

तात्या– तें मी पाहून घेईन. तू काळजी करूं नकोस.

मन्या– पण काय हो तात्या–तें 'मुजरा' कां काय म्हणतात तेंहि करावं लागेल का ?

तात्या– अर्थात् !

मन्या– अहो पण तें कसं जमायचं ? तें करतांना कमरेंत वाकावं लागतं कां गुडघ्यांत वाकावं लागतं हे देखील मला माहीत नाहीं.

तात्या– मन्या–मन्या, अरे ऐतिहासिक नाटकांत कधीं काम केलं होतंस की नाहीं?

मन्या– केलं होतं कीं !

तात्या– कसल ?

मन्या– 'रायगडचा सरदार' या नाटकांत रायगडाचं काम केलं होतं मी !

तात्या– रायगडाचं ? डोकं ताळयावर आहे कां तुझं ?

मन्या– होय तात्या. त्या नाटकांत आम्ही पुठ्ठयाचा रायगड केला होता तो धरून त्याच्यामागें (हात वर करून) मी हा असा उभा होतो.

तात्या– (कपाळाला हात लावीत) नशीब! 'गड आला पण सिंह गेला' मध्ये तानाजीच्या घोरपडीचं काम केलं नाहींस.

मन्या– तात्या तें सगळं झालं हो पण मुख्य मुद्याची गोष्ट राहिली.

तात्या– कुठली रे ?

मन्या–अहो, राजेसाहेब आमची परीक्षा घेतील पण आम्हांला 'परीक्षक' होण्याचा चान्स मिळेल कीं नाहीं?

तात्या–म्हणजे ?

मन्या–म्हणजे त्या' गंगामैया 'चं दर्शन आम्हांला घडेल कीं नाहीं ? का त्याच्या दारीवर वाळत घातलेल्या कपडयांकडे पाहूनच आम्ही त्यांची परीक्षा करायची ?

तात्या–छे छे ! तें काय म्हणून ? तूंहि तिची परीक्षा घे ना. तीहि व्यवस्था करून ठेवली आहे मी ! पण हें बघ मन्या, जरा वाह्यातपणाचं प्रमाण कमी कर हं ! कांहीं झालं तरी खानदान घराण्यांतली ती मुलगी आहे. तुझा चरबटपणा मुळीच खपणार नाहीं तिला.

**मन्या**–भले ! म्हणजे तात्या, हे भलभलते आरोप करतां आहांत हं तुम्हीं माझ्यावर ! आतां तसं आपल्याला जरा मोकळेपणानं बोलायची संवय आहे–पण म्हणून सगळ्याच ठिकाणीं आमचं तोंड चालतं असं कांहीं नाहीं हं !

( एवढ्यांत आंतून राजेसाहेबांची आरोळी ऐकूं येते–" कोण आहे रे तिकडे ? अरे कुठें गेलींत ही सारीं माणसं ? "

**तात्या**–ऐकलंस हें ? सारीं माणसं ! अजूनहि राजेसाहेबांना वाटतं कीं आपल्या हाताखालीं पांचपन्नास माणसं आहेत म्हणून ! सुंभ जळाला तरी पीळ अजून कायम आहे.

( आंतून राजेसाहेब–अरे कोणीच कसे ' ओ ' देत नाहीत )

**तात्या**–( गडबडीनं ) आलों महाराज ! हा पहा आलोच !

(मन्याला ' थांब ' असं सांगून घाईघाईनं आंत जातात. मन्या खिश्यां-तून सिगारेटचं पाकीट बाहेर काढतो. सिगारेट तोंडांत ठेवून पेटवणार एवढ्यांत बाहेरच्या दारांतून रंग्या आंत येतो.)

**मन्या**– अहो रंगराव दाभाडे ! महाराज हांक मारीत होते तुम्हाला !

**रंग्या**– मल्ली ? काय म्हनत होते ते ?

**मन्या**– आतां मला काय माहिती ? ' कोण आहे रे तिकडे ' असं म्हणत होते खरे !

**रंग्या**– (बेफिकिरीनं) ऊंः ! समजलं ! दिवसभर त्येच चालत असत त्येच ! आतां ' ओ ' तरी कुनाला अन् किती येळां द्यायची ?

**मन्या**– (आश्चर्यानें) आं ? काय म्हणालास ?

**रंग्या**– अवो, नाईं तर काय ? मी एकटा मनुक्ष इथं ! कुनाकुनाचं काय काय पहानार? राजेसाहेबांचं काम व्हतं न व्हतं तों बाईसाह्यबादुसरंच काम सांगत्यांत. त्ये करायला लागलों कीं कारभारी लगेच दमकन् अंगावर वरडत्यात. तुमच्या शयरामंदी त्यो पायानं चेंडूला लाथा मारायचा खेळ असतो नवं का–

**मन्या**– हो, हो, फुटबॉल !

**रंग्या**– व्हय ! तसला ' फुटबॉल ' करून टाकलाय यांनीं माझा ! येखादं दिवशीं फटकन् ' पंचर ' व्हऊन गेलो मंजी मग समजल सगळयांना ! ( एवढयांत त्याची आंतल्या बाजूकडे नजर जाते ) बापरे ! राजेसाह्यब आन् कारभारी हाकडंच येत्यात कीं ! हितं राह्यलो तर आपली कांहीं धडगत नाय् (घाईघाईनं निघून जातो.) (तात्या प्रवेश करीत आंतल्या बाजूकडे पाहून म्हणतात ' यावंत यावंत महाराज ! ' राजेसाहेब प्रवेश करतात. त्यांचा पेहराव–मलमलचा सदरा, चुणीदार पायजमा, डोक्यावर मराठेशाही मंदील, पायांत चढाव, भरघोस मिशा आणि कपाळाला टिळा लावलेला. )

तात्या ( हलकेंच मन्याला ) मन्या, मन्या, अरे मुजरा कर ! मुजरा कर !

( मन्या मुजरा करण्याचा प्रयत्न करतो )

**राजेसाहेब**–( तात्यांना ) कारभारी, हे पाहुणे असं कपाळ कां बडवून घेत आहेत ?

तात्या–( मोठ्यानें ) ते तुम्हाला मुजरा करीत आहेत महाराज !

**राजेसाहेब**–मोठा अजब प्रकार दिसतो आहे हा मुजऱ्याचा !

**तात्या**–मुंबईला असाच मुजरा करतात महाराज ! महाराज, हा माझा भाचा मनोहर शिगरे. मी आपल्याला ज्याच्याबद्दल सांगत होतों तोच हा !

( राजेसाहेब मन्याला खालपासून वरपर्यंत न्याहाळतात. मन्या अस्वस्थ होतो. )

**राजेसाहेब**–कारभारी, हे असे घाबरल्यासारखे कां दिसत आहेत ?

**तात्या**–महाराज, दाखवायला नेण्याची ही त्यांची पहिलीच वेळ म्हणून जरा—

**मन्या**–तात्या !

**तात्या**–( हलकेंच ) गप्प बैस रे जरा !

**राजे**–हं अस्सं ! यांचं शिक्षण कुठपर्यन्त झालं आहे म्हणालांत ?

**तात्या**–बी. ए. झाला आहे तो !

**राजे**–उद्योग काय करतात ?

मन्या–( तात्यांना ) सांगा त्यांना बेकार आहें म्हणून !

राजे–( ऐकूं न आल्यानं ) काय म्हणाले हे ?

मन्या–[ गडबडीनं ] कांहीं नाहीं ! ' मे अँड बेकर ' कंपनींत नोकरीला आहे असं म्हणतो आहे तो !

राजे–काय काम असतं तिथं ?

( तात्या गोंधळून मन्याकडे पहातात )

मन्या–( मोठ्यानं तात्यांना ) तिथ टाईपिंग सेक्शनमध्यें ' लाईन मारण्याचं ' काम करतों म्हणावं !

राजे–पगार काय मिळतो यांना त्याबद्दल ?

मन्या–[ वैतागानं ] जोडे मिळतात !

राजे–[ तात्यांना ] काय म्हणाले हे ?

तात्या–क–कुठं काय ? हा म्हणाला·जो–जो कांहीं मिळेल तो पगार घ्यावा लागतो.

राजे–कॉलेजांत कोणकोणते विषय शिकत होते ते ?

मन्या–[ निर्विकारपणानं ] युनिव्हर्सिटीनं नेमलेले सोडून बाकी सगळे !

राजे–काय म्हणतात हे ?

तात्या–तो– म्हणतोय की पामिस्ट्री, जॉमेट्री कार्पेट्री, टेपेस्ट्री, पेस्ट्री वगैरे बरेच विषय होते ! महाराज, आपणच काय तें सरळसरळ विचारा ना त्यांना !

[ राजेसाहेब आतां सरळपणें मन्याकडे तोंड करून उभे राहतात ],

राजे–कॉलेजांत आणखी कशाकशांत प्रगती दाखविली होती तुम्ही ?

मन्या–मी मराठी वाङमयमंडळाचा चिटणीस होतों.

राजे–( ऐकूं न आल्यानं ) कसलं मंडळ म्हणालांत ?

मन्या–( मोठ्यानं ओरडून ) मराठी वाङमयमंडळ !

राजे–अहो, इतक्या मोठ्यानं काय ओरडताय् ? बरं ! त्या मंडळांत काय करायचे तुम्ही ?

मन्या–आम्हीं साहित्यावर चर्चा करायचों. वादविवाद, निबंधस्पर्धा, लघुकथा–स्पर्धा, सहली, निवडणुकी, नाटक, वार्षिक स्नेहसंमेलन—

राजे– बस् बस् बस् बस् ! कळलं ! थोडक्यांत म्हणजे फुकट वेळ घाल-वीत होतां तुम्ही तिथं ! बरं, पण काय हो ! तुमच्या त्या वाङ्मय मंडळांत व्यायाम बियाम कांहीं करीत होतां कीं नाहीं ?

मन्या– ( हलकेंच तात्यांना ) तात्या, त्यांना सांगा कीं वाङ्मय मंडळ म्हणजे कांहीं व्यायाम शाळा नाहीं. तिथं मुली असतात म्हणावं.

राजे– काय म्हणाले हे ?

तात्या– तो म्हणतोय कीं सिंगलबार, डबलबार वगैरे बराच व्यायाम करत होते हे !

राजे– कांहीं ' उत्पादक ' व्यायाम वगैरे कांहीं करीत होते कीं नाहीं ?

मन्या– (ओरडून) उत्पादक ? तात्या तिथें मु—

तात्या– (हलकेंच) अरे, त्यांना ' विधायक '—' कंस्ट्रक्टिव्ह '— असं म्हणायचंय् !

मन्या–मग त्यांना सांगा कीं तसल्या व्यायामाला अद्याप तिथं सुरुवात झाली नाहीं आणि कधी होणारहि नाहीं !

राजे–[ तात्यांना ] काय ?

तात्या–नाहीं तोहि व्यायाम जोरांत चालू आहे असं म्हणतात हे !

राजे–तुमचा आवडता खेळ कोणता ?

मन्या–पिंगपाँग !

राजे–काय म्हणालांत ?

मन्या–( मोठ्यानं ) पिंगपाँग ! (महाराजांच्या चेहऱ्यावर प्रश्न चिन्ह)

तात्या–[ मध्येंच ] महाराज, तो चिनी ' जोडीचा ' एक प्रकार आहे.

( आविर्भाव करून दाखवीत ) इकडून जोडी फिरवली कीं ' पिंग ' तिकडून फिरवली कीं ' पाँग ' असं खूप वेळा करायचं ! असा घाम निघतो म्हणून म्हणतां !

राजे– असं का ? छान, छान ! पण त्या चिनी व्यायामाचा यांच्या शरीरावर कांहींच परिणाम झालेला दिसत नाहीं.

मन्या– कारण त्याचबरोबर 'चाटामाल' ह्या जातानी व्यायाम घेतल्यामुळें अशी स्थिती झाली आहे माझी !

राजे– व्यायामाबरोबर खुराक कसला घेतात हे ?

मन्या– (तात्यांना) त्यांना सांगा ' हवा ' खातों म्हणून !

तात्या– (राजेसाहेबांना) हवा तेवढा आणि हवा तो खुराक घेतो म्हणून म्हणताहेत. बदाम, पिस्ते काजू, मनुका, अक्रोड वगैरे वगैरे.

मन्या– (स्वतःशींच) इथे डाळं–मुरमुरेदेखील पचायची पंचाईत आणि बदाम पिस्ते खातोय् म्हणे !

राजे– तुम्हीं घोड्यावर बसला होता कां कधीं ?

मन्या– होय ! एकदांच बसून पाहिलं होतं. पण थोड्या वेळानं मी घोडा आणि तो स्वार अशी स्थिती झाल्यामुळें तो नाद कायमचा सोडून दिला.

राजे– कोल्हापुरचे बाबासाहेब शिगरे तुमचे कोण ?

मन्या– (हलकेंच तात्यांना) ते आणि मी सख्खे पुरुष-पुरुष आहोंत असं सांगा त्यांना

राजे– काय ?

तात्या– (मोठ्यानं) याच्या मामीची मावशी आणि बाबासाहेबांच्या मावशीची मामी या दोघीहि सख्या बहिणी बहिणी आहेत असं म्हणतोय.

राज– (मन्याला) कां हो–समजा, तुमच्याकडे अचानकपणें दहा पाहुणे आले आणि तुमच्या घरांत कांहींच सामान नसलं तर तुम्ही काय कराल ?

मन्या– (हलकेंच तात्यांना) तात्या, माझं घर म्हणजे यांना काय गड-गडपूर संस्थान वाटलं ? प्रत्येक पाहुण्याकडून रुपया रुपया घेऊन त्यांना सरळ हॉटेलांत घेऊन जाईन म्हणावं !

तात्या– (घाबरून) अरे जरा हळू !

राजे– (तात्यांना) काय हो, काय म्हणत आहेत हे ?

तात्या– कुठं काय–कांहीं नाहीं! तो म्हणतोय कीं दहा पाहुण्यांचीच काय गोष्ट आहे ? शंभर पाहुणे आले तरी मागें हटणार नाहीं तो ! नाहीं का मन्या ?

**मन्या**–( मोठ्यानें ) होय तर ! ( हलकेंच ) त्यांच्या खिशांत पैसे असले म्हणजे झालं !

**राजे**–तुम्हांला कांहीं व्यसनं वगैरे ?

**मन्या**–तात्या, हा जरा वाजवीपेक्षां जादा खाजगी प्रश्न आहे. माझीं सारीं व्यसनं जर मी खरोखरच यांना सांगायला लागलों तर या म्हाताऱ्याचे डोळे पांढरे होतील.

**तात्या**–( महाराजांना ) छे छे, हो ! आमच्या मन्याला अगदीं सुपारीचं देखील व्यसन नाहीं.

**राजे**–साफ खोटी गोष्ट आहे ही ! मघाशीं आपण आलों त्यावेळी यांच्या हातांत शिग्रेट पाहिली होती मी ! आपल्याला पहातांच यांनीं ती विझवून टाकली.

**तात्या**–( रागानं ) होय का रे मन्या ?

**मन्या**– (घाबरून) नाहीं पण तात्या—

**तात्या**– गाढवा, मूर्खा, हरामखोरा, मग इतका वेळ कां बोलला नाहींस?

**मन्या**– नाहीं तात्या ! मीं तसा नेहमीं ओढतों असं नाहीं पण–

**तात्या**– अरे नतद्रष्टा, कर्मचांडाळा, पाप्या–

**मन्या**– तात्या, देवाशपथ मी पुन्हां कधींहि—

**तात्या**– एक शब्द बोलू नकोस. गधड्या, तूं इतका 'हा' असशील असं मला वाटलं नव्हतं.

**मन्या**– तात्या चुकलों ! पाया पडतों मी तुमच्या !

**तात्या**– आतां पाया पडून काय उपयोग ? (हलकेंच त्याच्या कानाशीं) अरे बेअकली टोणग्या–महाराज यायच्या आधीं मला 'एक' कां दिला नाहींस ? तेवढीच मला मनमुराद नसती कां ओढतां आली ?– आता महाराजांच्या समोर काय ओढणार कपाळ ? (मन्या सुटकेचा निश्वास टाकतो)

**राजे**– कारभारी-कुठल्या छापाची शिग्रेट यांच्याजवळ आहे तें तर पाहूं या !

**तात्या**– ( मन्याच्या अंगावर खेकसून ] दे–दे महाराजांना तें पाकीट आता ! (मन्या हलकेंच खिशांतून पाकीट काढतो त्यांत एकच सिगारेट असते. ती तो भीतभीत राजेसाहेबांना देतो–आणि पाकीट फेकून देतो)

तात्या— मन्या–मन्या अरे तें पाकीट खरंच रिकामं होतं कां ? आणि मघाची ती फेकून दिलेली कुठं टाकलीस रे तूं ?

[ आजूबाजूला शोधूं लागतात. मन्या खिशांतून काडयाची पेटी काढून महाराजांची सिगारेट पेटवतो. महाराज एक मनमुराद झुरका घेतात आणि मोठ्या समाधानानं धुराचा भपकारा सोडतात )

राजे— कारभारी–जांवई पसंत आहे आपल्याला ( सिगारेट न मिळालेले तात्या हताश होऊन राजेसाहेबांच्याकडे पहातात. लगेच तोंडावर हास्य आणून म्हणतात)

तात्या— आहे ना ? आहे ना ? मला वाटलंच ! महाराज, म्हटलं भावा कुणाचा आहे ?

राजे— योग्य बोललांत ! तुमची निवड चुकणार नाहीं याबद्दल आमची खात्रीच होती ! आतां गंगूला पाठवून द्या इकडं. पाहूं द्या यांना एकदां तिला मग काय तें ठरवून टाकूं ( गंगू–अग गंगे ! अशा हांका मारीत खुशींत येऊन झुरके मारीत आंत जातात. तात्या कांहीं क्षण कमरेवर हात ठेवून मन्याकडे रोखून पहात उभे राहतात. मन्या थोडा बावरतो आणि म्हणतो )

मन्या— तात्या ! रागावूं नका–मुंबईला परत गेलो म्हणजे खोकंभर सिगारेटचीं पाकीटं पाठवून देईन मी तुम्हाला. पण असे भयानक नजरेनं पाहूं नका बुवा [ तात्यांचा राग कांहींसा शांत होतो ] तात्या ! आतां गंगूबाई इकडे येतील तेव्हां–तेव्हां तुम्ही इथं नसलांत तर चालेल तात्या !

तात्या— चोरा ! आत्तांच्या आत्तां मी तुला नकोसा झालों काय ?

मन्या— नाहीं, तसं नाहीं तात्या ! पण जरा कांहीं खाजगी प्रश्न विचारायचे आहेत म्हणून म्हटल—

तात्या–अरे लग्ना आधीं कसले खाजगी प्रश्न विचारतोस रे ?

मन्या–तें सांगतां नाहीं यायचं तात्या ! पण तुम्ही इथं असलांत म्हणजे मलाहि संकोच वाटेल अन् तिलाहि ! थोडा मोकळेपणा असलेला बरा नाहीं का तात्या ?

तात्या–अस्सं होय ? अरे लुच्च्या ! बरं तूं म्हणतोस तसं कां होईना ! पण मन्या जरा बेतानंच हं ! नाहींतर आत्तांपर्यंन्त जमवून आणलेलं सगळं

फिसकटून टाकशील. ( ते आंत जातात आणि थोड्याच वेळांत त्याच बाजूनं गंगू हलकें हलकें पावलं टाकीत पुढें येते. तिनं नऊवारी पातळ नेसलेलं आहे. डोक्यावरून पदर घेतलेला आहे. जुन्या पद्धतीचा ब्लाऊज घातलेला आहे. रहाणी जरी जुन्या पद्धतीची दिसत असली तरी बोलण्या-चालण्यांत एक प्रकारचा संस्थानी ठसकेबाजपणा आहे. ती समोर येऊन उभी रहाते. मन्या निम्मा सदं होतो; पण स्वतःला सांवरीत एकदां घसा खांकरून स्वतःचे कपडे ठाकठीक करीत तो ताठ उभा रहातो. )

मन्या–बसा कीं !

( गंगू खालीं बसायला लागते. )

मन्या–अहो, अहो, तिथं जमिनीवर नव्हे–वर खुर्चीवर बसा.

( ती खुर्चीवर बसते. )

मन्या–( पुन्हां एकदां कॉलर सांवरून घसा खांकरीत ) तुमचं अ–तुमचं नांव गंगूच ना ?

गंगू–होय.

मन्या–कुणी ठेवलं हो हें नांव ?

गंगू–माला नाहीं माहीत ! आमी लहान होतो त्यावेळो !

मन्या–( बिचकून ) असं कां ? बरं बरं ! पण तुम्हाला आवडतं कां हो हें नांव ?

गंगू–न आवडायला काय झालं ? चांगलं नदीचं नांव आहे कीं !

मन्या–( आवंढा गिळीत ) हो हो ! खरच बरं कां ! बरं पण तुम्ही कुठपर्यंत शिकलांत ?

गंगू–बारा एक बारापर्यंन्त सगळे पाढे येतात मला! म्हणून दाखवूं का ?

मन्या–( घाबरून ) नको नको !

गंगू–मला सगळी बाराखडी पण येते हं ! अ–आ–इ–ई–उ–ऊ–ए–ऐ–

मन्या–ए आई !! ( हात जोडून ) आतां पुरे !

गंगू–हें काय हो ? तुम्ही आमाला सगळं म्हणूं पण देत नाहीं ! आज सकाळीं तर कारभाऱ्यांनीं पांचसहा वेळां म्हणून घेतलं.

मन्या–अहो, त्यांना तेवढाच कारभार आहे. आपण जरा दुसऱ्या गोष्टी-बद्दल बोलूं या कीं !

गंगू–( नाखुषीनं ) हं !

मन्या–कां हो ? तुम्ही कधीं मुम्बईला आला होता कां ?

गगू–हो ऽ ! एकदां राजेसायबांच्याबरोबर गवर्नरच्या बायकोला बाळंत-विडा–घेऊन–एकदा मावशीबरोबर बाळूच्या सोडमुंजी ला, एकदां विले-क्ट्रिकच्या दिव्याची आरास पहायला–आन् एकदा आमचा टायगर कुत्रा आजारी पडला होता त्याला घेऊन–चांगली चार वेळेला आली होती कीं मी !

मन्या–आवडली का हो मुम्बई तुम्हांला ?

गगू–आमाला नाई बाई आवडली ! फारच घाम येतो तिथं !

मन्या–अहो, पण बाकीच्या इतरहि अनेक गोष्टी आहेत कीं तिथ !

गंगू–त्यानला काय चाटायचंय ?

मन्या–( सुस्कारा सोडून ) हो–बाकी तेहि खर आहे म्हणा ! तुम्हाला त्या गोष्टीचा तरी काय उपयोग ? बरं पण काय हो, तुम्हाला जरा एक महत्त्वपूर्ण प्रश्न विचारतों ह ! तुमचं जीवितविषयक तत्त्वज्ञान काय आहे ?

गंगू–म्हणजे काय बाई ?

मन्या–म्हणजे–म्हणजे त्याचं असं की–तुम्ही जीवनाकडे आशावादी दृष्टीकोनांतून पहातां कीं निराशावादी ?

गंगू– (बुचकळ्यांत पडून) अहो, पण म्हंजे तरी काय ?

मन्या– अंऽ–म्हणजे ऽ–त्याचं असं आहे, की समजा–तुमच्यापुढें एखादा पाण्यानं अर्धवट भरलेला कांचेचा ग्लास आणून ठेवला तर तुम्ही काय म्हणाल?

गंगू– मी म्हणल कीं कुणा मेल्यानं हें अर्धवट भरून ठेवलंय ? त्याची अक्कल काय चुलखंडांत गेली होती.

मन्या– (कपाळावर हात मारून घेत) अहो अहो, तसं नाहीं हो, पण-तो ग्लास अर्धा भरलेला आहे याबद्दल तुम्हांला समाधान वाटेल कीं अर्धा रिकामा आहे म्हणून वाईट वाटेल ?

गंगू– तो माझ्यापुढें आणूनच कां ठेवला म्हणून राग येईल मला !

( मन्या चारी मुन्ड्या चीत ! )

मन्या– ( स्वतःला सांवरीत ) बरं ! तें असो. आतां दुसरा प्रश्न ! अशी कल्पना करा, कीं आपण दोघं दूऽर दूऽर फिरायला गेलों आहोंत आणि–

( गंगू मोठ्यानं राजेसाहेबांना हांक मारते. ' बाबासाहेब हे पहा मला कांहीच्या कांहींच विचारताहेत. ' )

मन्या– ( घाबरून ) अहो अहो, तस नाहीं हो ! अहो नुसतं कल्पना करा म्हटलं मी !

गंगू– (रागानं) कल्पना कसली करायची डोंबल्याची ! –अन् खरंच तुम्ही तस कांहीं केलंत तर ?

मन्या– (आशाळभूतपणानं) तर तुम्हाला काय वाटेल हो ?

गंगू– बाबासाहेबांना सांगीन मी असलं भलतंसलतं कांहीं बोलाल तर ?

मन्या– बर बरं ! नाहीं बोलत हं ! म्हणजे मला असं म्हणायचं आहे की समजा-आपण दोघं नाहीं-पण एक तरुण आणि एक तरुणी, समुद्रकांठी दूऽर दूऽर फिरायला गेलीं आहेत. समुद्रकांठच्या मऊ मऊ रेतींत दोघेहिजण हातात हात घालून ( दचकून तिच्याकडे पहात ) नाही नाहीं–एकमेकापासून हातभर अंतरावर बसलेलीं आहेत. सायंकाळची सुरम्य वेळ आहे. सूर्यास्ताचा नितात रमणीय देखावा समोर दिसतो आहे. सागराच्या फेनशुभ्र लाटा सुवर्णमय होऊन जलपृष्ठावर मनोहर नर्तन करीत आहेत. पश्चिमेकडून येणाऱ्या थंडगार वायुलहरीमुळें दोघांचींहि मनें कशीं प्रफुल्लीत आणि शरीरें कशी रोमांचित होऊन गेलीं आहेत ! थोड्याच वेळानं सूर्याचं तें लालभडक बिंब पाण्यावर टेकतं आणि पहातांपहातां तें सागराशीं एकरूप होऊन जातं ! अशा वेळीं तें दृश्य पाहून ती तरूणी त्या तरूणाला काय म्हणेल ?

गंगू– ती म्हणेऽल, कीं कांहो, आतां सूर्याचं बिंब पाण्यांत पडलं–मग त्याचा चर्रर असा आवाज कां नाहीं आला ? (मन्याचा चेहरा टाळक्यांत दगड पडल्यासारखा होतो ) पण काय हो ? तो तरूण काय म्हणेल ?

मन्या– (वैतागानं) तो म्हणेल कीं चला–संध्याकाळ झाली. आतां घरीं जाऊ या.

गंगू– छान ! मला अगदी असंच वाटलं होतं.

मन्या– ( मुस्कारा सोडीत ) वाटायचंच ! नशीब त्या तरूणाचं ! बरं हें पहा आतां एक नाजुक प्रश्न विचारतो. तुम्हीं हें नऊवारी पातळ सोडून पांचवारी नेसू शकाल कां ?

गंगू– ( रागानं ) काय म्हणालात ?

मन्या–( दचकून ) नाहीं–म्हणजे इथे माझ्यासमोर असं नाहीं म्हणत मी ! पण आपलं एकंदरीत पद्धतीबद्दल विचारलं !

गंगू–मला नाही आवडत तसलं फडकं गुंडाळायला !

मन्या–अहो, असं कसं म्हणता येईल ? अहो, आजकाल हजारों स्त्रिया नेसताहेत की तसली पातळं ! तुम्ही सिनेमा वगैरे पाहिले नाहीं वाटतं ?

गंगू–पाहिले की ! आमच्या गावच्या जत्रेंत दरवर्षी शिनेमा येतात कीं!

मन्या–कोणकोणते चित्रपट पाहिलेत तुम्ही ?

गंगू–चित्रपट नाही-फक्त शिनेमाच पाहिलेत ! संत सखू, गोरा कुंभार, संत नामदेव, रामराज्य, शंकरपार्वती—

मन्या–अहो. मग त्या ' शंकरपार्वती ' मधील पार्वती जॉर्जेटची पांच-वारी साडी आणि त्राकेडचा ब्लाऊज घालते हें तुमच्या लक्षांत आलं नाही वाटत ?

गंगू-ती नेसत असेल. ती देव आहे. देवाला सगळं कांहीं चालतं, पण माला नाही चालायचं !

मन्या–बरं बरं ! ते असो. पण हें पहा–आतां एक थोडा. अधिकच खाजगी प्रश्न विचारतो. म्हणजे असं की मी आतां इतका वेळ तुमच्याशीं बोलतो आहे, तेव्हां तुमचं माझ्याविषयीं काय मत झालं आहे तें सांगू शकाल का ?

गंगू–म्हणजे काय ?

मन्या–( अडखळत ) म्हणजे ' मत ' म्हणजे आपलं ' ओपिनियन ' हो! म्हणजे तुम्ही माझ्याविषयी काय ओपिनियन फॉर्म केलंत हें कळूं शकेल कां ? ( तिला कांहीच कळलं नाहीं हें त्याच्या लक्षांत येतं ) यापेक्षां

सोपं करून सांगणं कठीण आहे. ( निश्चयानं ) आतां सरळच विचारतों तुम्हाला मी कसा काय वाटलों हो ?

गंगू–मला नाहीं बाई सांगतां येत.

मन्या–अहो, असं काय करताय् ? थोडंफार कांहींतरी तर वाटलं असेलना माझ्याविषयीं—म्हणजे असं कीं तुम्हाला तुमच्या वडिलांविषयीं किंवा आमच्या तात्यांविषयीं जे वाटतं, त्यापेक्षां माझ्याविषयीं कांहीं निराळं वाटलं कीं नाहीं ?

गंगू–हो–वाटलं कीं !

मन्या–( आशेनें ) काय ?

गंगू–ते दोघेजण बोलत असले म्हणजे डोकं कधीं दुखत नाहीं–पण आतां मात्र दुखायला लागलय् !

( मन्याचा चेहरा—? )

मन्या–( पुन्हां एकदां धीर धरून ) हें पहा–आतां तुम्हाला एक शेवटचा प्रश्न विचारतो. तुमच्या ' हॉबीज् ' काय आहेत ?

गंगू–हॉबीज्–म्हणजे ?

मन्या–अरे हो, विसरलोंच ! ' हॉबीज् म्हणजे '–म्हणजे–आवडीच्या गोष्टी–म्हणजे काय काय आवडतं तुम्हाला ?

गंगू–मला किनईऽ शेपूची भाजी फाऽर आवडते.

मन्या–शेपूची भाजी ? ( त्याला ओकारी येते. ) जा जा–बाई तुम्ही आता जाऊ शकतां.

(गंगू आश्चर्यानें त्याच्याकडे पहात आंत निघून जाते थोड्या वेळान तात्या प्रवेश करतात.)

तात्या- (मन्याच्या पाठीवर थाप मारून) हं ! काय मन्या, कशी काय वाटली तुला आमची गंगूबाई ?

मन्या- कोण ? ती शेपूची भाजी ? तात्या नमस्कार ! येतो मी ! चांगलं त्या गंगेत घोडं न्हायलं आमचं ( जाऊ लागतो )

तात्या- अरे ए गाढवा, अरे निघालास कुठं ? महाप्रयासानं मी एवढं सारं जुळवून आणलं, अन् तूं खुशाल आपला चालायला लागलास ?

मन्या– तात्या, तुम्हाला चेष्टाच करायची होती तर माझ्याऐवजी दुसरा एखादा बकरा नाहीं का सांपडला तुम्हाला ?

तात्या– मन्या मन्या, अरे काय बोलतोस काय तू ? अरे एवढं झालं तरी काय ?

मन्या– काय झालं ? काय झालं नाहीं ते विचारा. अहो हो काय मुलगी आहे का मॉडर्न आर्ट ? हिच्याशीं लग्न करणारा मनुष्य दोन दिवसांत वेड्याच्या इस्पितळांत जाईल आणि तिथं जाऊन तिच्याबद्दलच्या नुसत्या आठवणीनं आणखी पिसाळेल ! तात्या, तुम्ही काहीहि म्हणा. पण परमेश्वरानं हा ' नग ' घडवला त्यावेळं त्यानं नक्की वाजवीपेक्षां ' जास्त ' घेतली असली पाहिजे.

तात्या– ( थोड्या रागानं ) तसंच मला आतां तुझ्याबाबतहि वाटायला लागलं आहे. काय रे–मी तुला असं विचारतों कीं एवढ्याश्या बोलण्यावरून तिच्या स्वभावाची काय परीक्षा केलीस तू ?

मन्या– मग परीक्षा करायला आणखी काहीं ' केमिकल ॲनॅलिसीस ' करावं लागत कीं काय तात्या ? बस्स ! झाली एवढी परीक्षा पुरी झाली. आणखी खालांत जायची आपली इच्छा नाहीं आपली ! तात्या तुम्हाला हात जोडून विनंती करतो कीं, या गंगामाईना डोक्यावर घेण्यासाठीं एखादा तसलाच ' जोरदार ' भगीरथ शोधून काढा. माझ्यासुध्या माणसाच्यानं झेपायचं नाहीं हें प्रकरण !

[ एवढ्यांत राजेसाहेब प्रवेश करतात ]

राजे–हं बोला कारभारी–काय मत आहे पाहुण्यांचें ?

तात्या–( घुटमळत ) तो म्हणतोय कीं तशी मुलगी पसंत आहे. पण–

मन्या–( मोठ्यानें ओरडून ) मुळींच पसंत नाहीं मला !

राजे–( मन्याला ) काय म्हणालांत ? पसंत नाहीं ? माझी गंगू तुम्हांला पसंत नाहीं ?

तात्या–( मध्येंच ) नाहीं–म्हणजे ' तशी ' पसंत आहे–

मन्या–( ठासून )' तशी ' हि नाही अन् ' अशी ' हि नाहीं. कशीहि मला पसंत नाहीं ती !

राजे– (संतापनं) काय इतका उघडउघड नकार? आमच्या राज्यांत येऊन आमचा अपमान? आमच्या वाड्यांत येऊन आमची बेइज्जत? आमच्या दिवाणखान्यांत उभे राहून ही बेमुर्वतखोरी? या मार्तंडराव वाघमाऱ्यांच्या कानांना हीं असलीं उत्तरं ऐकण्याचो संवय नाहीं. कोण आहे रे तिकडे?

मन्या– ( शांतपणें ) कोणी नाहीं. तो रंग्या गेला असेल बिड्या फुंकायला बाहेर! आणि असला तरी इथं येऊन कांहींहि उपयोग नाहीं.

तात्या– मन्या, मन्या,-

मन्या– हें पहा तात्या, ( मोठ्यानें ) अहो मिस्टर वाघमारे––

राजे– [ रागानं ] राजेसाहेब म्हणतात मला!

तात्या– बर बुवा–राजेसाहेब! पाहिजे तर ' इस्पिक 'चे राजेसाहेब म्हणतों–तेव्हां ' किलवर 'चे तात्यासाहेब आणि ' इस्पिकचे 'चे राजेसाहेब तुम्हाला दोघांनाहि हात जोडून विनंती करतों कीं माझ्या फदांत तुम्ही पडू नका. इथल्या स्थावर, जंगम किंवा कोणत्याहि प्रकारच्या इस्टेटींची लालूच दाखवून त्या जाळ्यांत मला पकडतां येईल अशी जर तुमची कल्पना असेल तर ती साफ चुकीची आहे. गडगडपुरांत त्या सौभाग्यकांक्षिणी गंगाबाईसाहेबांच्या बरोबर जन्मठेप भोगण्यापेक्षां मी सरळ ' गेट् वे ऑफ इंडिया ' वरून खालीं उडी टाकून जीव देईन.

तात्या–मन्या, मन्या–काय बोलतो आहेस हें?

मन्या–तात्या, जरा स्पष्ट बोलतों म्हणून क्षमा करा. गेलीं अठरा वर्षं तुम्ही गडगडपूर संस्थानचा कारभार पहात होतां; पण मला आधी एक पत्र पाठवून माझी लग्नाची तयारी आहे किंवा नाहीं? मुलीविषयीं माझ्या भावना काय आहेत? मुलगी पहायला मी इकडे येऊ शकेन कीं तुम्हीच तिकडे यावं या साध्या गोष्टी विचारण्याची देखील तुम्हांला आवश्यकता वाटली नाहीं याचं मला नवल वाटतं.

राजे–काहो राजेश्री? एवढ्या धडधडीतपणानं तुम्हीं अगदीं नकार देतां आहांत मग मुलीविषयींच्या तुमच्या अपेक्षा तरी काय आहेत ते तर कळूं द्या एकदां!

मन्या– मुलीविषयीं अपेक्षा ? काय ' व्हेग ' प्रश्न विचारता आहांत तुम्ही मिस्टर वाघमारे ! —

राजे– ( संतापून ) राजेसाहेब म्हणा !

मन्या– चुकलों ! —राजेसाहेब !—आतां तुमच्या प्रश्नाचं उत्तर काय देणार ? मुलीविषयीच्या माझ्या अपेक्षा काय आहेत ! (सुस्कारा सोडून धुन्द नजरेन) अहाहा ! काय वेडगळपणाचा प्रश्न आहे हा ! मानस सरोवरांतील राजहंसाला कमलिनीचं स्वरुप कसं असावं हें आजपर्यंन्त कुणी विचारलं आहे कां ? नंदनवनांतील नयनरम्य पुष्पांच्या भोवतीं गुंजारव करीत फिरणाऱ्या भृंगाला सुवर्ण कमलाच रूप कशा तऱ्हेच असावं हें विचारण्याचा वेडेपणा कुणी केला आहे का ? हिमालयाच्या उत्तुग पर्वतराशीवरून डौलानं विहार करणाऱ्या मेघमालिकांना कांचनगंगेच्या शिखराचं सौंदर्य कशा प्रकारच असाव असा खुळा प्रश्न कुणी विचारला आहे कां ? आश्विनी पौर्णिमेच्या रात्री मनमोहक तारकावृंदा बरोबर (हात वर करीत ) अनंत आकाशांत रासक्रीडा करणाऱ्या————

राजे– (त्याचा वर गेलेला हात खालीं घेत )अहो मराठी मंडळाचे चिटणीस कां फडणीस ! अनत आकाशांतून जरा खालीं जमिनीवर या ! तुमची रासक्रीडा राहूं द्या ! मी विचारलेल्या प्रश्नाच, साधं सोपं आणि सरळ उत्तर द्या आधीं !

मन्या– सरळ उत्तर देण हें तितकं साधं नाही आणि सोपंहि नाहीं.

तात्या– [ रागानं ] –आणि तें तुम्हाला जमणारहि नाहीं ! स्वतःला मदनाचे पुतळे समजणारे आणि सिनेमा नटांचे आदर्श डोळ्यापुढे ठेवणारे तुम्ही आजच्या पिढीचे तरूण. तुम्हाला त्या नर्गिस, निम्मी कीं अर्धी –कोण म्हणतात तसल्या नट्याच हव्या असणार ! पण तसल्या मुली तुम्हाला घरांत ड्रायव्हर किंवा आचारी म्हणून देखील ठेवणार नाहींत हें तुम्ही अगदीं साफ विसरतां !

राजे– (मन्याला) काय हो ! काय सांगायचं ते जरा व्यवहारी भाषेंत सांगा कीं––

मन्या– व्यवहारी भाषेंत सांगणं कठीणच आहे. पण आतां तुम्ही विचारताच आहांत तेव्हां भाषेच्या व्यवहाराचा आधार घेऊन सांगतो कीं––

राजे– लागलात पुन्हां कोलांट्या उड्या मारायला !

मन्या– नाहीं –म्हणजे इंग्रजी मूळाक्षरांच्या भाषेंतच सांगायचं म्हणजे मला ' ए ' पासून ' एम् ' पर्यंतच्या अक्षरांचे गुण असलेली मुलगी हवी.

राजे–म्हणजे काय ?

मन्या–' ए ' म्हणजे आर्टिस्टिक टॅंपरॅमेंट, ' बी ' म्हणजे ब्यूटी, ' सी ' म्हणजे कॉम्प्लेक्शन, ' डी ' म्हणजे डिव्होशन, ' इ ' म्हणजे एलेगन्स, ' एफ् ' म्हणजे–

राजे–हां हां हां हां ! बस झालं ! कां हो, हे सारे गुण असलेली मुलगी तुम्हाला पाहिजे काय ? तुम्ही स्वतःला काय ' एक्स वाय झेड् ' समजतां काय ? कधीं आरशांत तोंड तरी पाहिलं होतं का तुम्ही ?

तात्या–महाराज, जाऊं द्या, त्याच्या नादीं लागण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

राजे–( रागानं ) कां अर्थ नाहीं ? तें कांहीं नाहीं. मला याचा सोक्ष-मोक्ष लावलाच पाहिजे. अहो, एवढी शिकली सवरलेली मुलगी यांना पसंत नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे ?

मन्या–( आश्चर्यानं ) तुमची गंगू ? आणि शिकलेली ? ( तो मोठ-मोठ्यानं पोट धरधरून हंसूं लागतो. ) गडगडपूर युनिव्हर्सिटीची ग्रॅज्यूएट असेल बहुतेक ती ! आणि आमचे तात्या व्हाइस चॅन्सेलर असतील त्या युनिव्हर्सिटीचे ! ( त्याला हंसूं आवरत नाहीं. )

राजे–( रागानं )काय– ती शिकलेली आहे यावर विश्वास बसत नाहीं तुमचा ? अहो, मग इतका वेळ ' पाहिलंत ' म्हणजे काय केलंत तुम्हीं ? थाबा,तिला इथं बोलावून प्रत्यक्षपणें खात्रीच पटवून देतों

मन्या–( हंसत हंसत ) अहो कशाला तसदी घेतां आहांत निष्कारण ? तिच्या विद्वत्तेबद्दल संपूर्णपणें खात्री पटली आहे माझी !

राजे–तसं कशाला ? होऊन जाऊं द्या ना ! हा सूर्य आणि हा जयद्रथ ? ( मोठ्यानं ) गंगू–ए–गंगे !

( आंतून गंगूचा आवाज येतो " कमिंग् पपा ऽ ऽ. " अल्लडपणें उड्या मारीत ती प्रवेश करते तिच्या पोषाखांत बराच बदल झालेला आहे.जॉर्जेटची पांचवारी साडी आणि आधुनिक पद्धतीचा ब्लाऊज, पायांत सँडल्स ! दोन वेण्या उडवीत बोटाभोंवतीं बटवा फिरवीत ती प्रवेश करते. )

[ राजेसाहेबांच्या अर्धवट बहिरेपणाची जाणीव असल्यानें गंगू त्यांच्याशीं मोठ्या आवाजांत बोलते ]

गंगू– (राजेसाहेबांना) डिड यू कॉल फॉर मी पपा ? आय् एम् सो सॉरी इफ् आय् एम लेट. आय् होप यू वुइल एक्स्क्यूज मी.

राजे– ए–ए बाई ! तुझं तें पुण्याच्या वाडिया कॉलेजांतलं फाड्फाड् इंग्रजी माझ्यासमोर बोलू नको.या गांवठी साहेबाला सांग काय सांगायचं तें!

गंगू– ( मन्याला ) येस ? व्हॉट् कॅन आय् डू फॉर यू ?

(या वेळेपर्यंत मन्याचं आईस्क्रीम झालेलं आहे ! तो नुसता 'आ' वासून पहात रहातो) डिड य फॉलो व्हॉट् आय् सेड् ?

राजे– ( मन्याला ) कांहो आतां बोला ना ! आतां कां दांतखीळ बसली ? मघाशीं मारे हिच्या अडाणीपणाबद्दल तावातावानं बोलत होतां ना ? मग तुमची विद्वत्ता कां नाही पाजळत आता तिच्यापुढें ?

गंगू– ( आश्चर्यानं ) कोण मी ? अन् अडाणी ? तें काय म्हणून ? .

राजे– तें या–या बालिस्टराला विचार. त्यानं तुला नापसंत केलंय् म्हणे !

गंगू– मग करेनात ? हात्तिच्यां ! त्यात एवढं विशेष काय आहे ?

राजे– ( आश्चर्यानं ) त्याबद्दल तुला कांहींच वाईट वाटलं नाही ?

गंगू– अहो, त्यांत वाईट काय वाटायचय् पपा ? जगांतल्या साऱ्याच तरुणांनीं अजून कांहीं ' गेट वे ऑफ इंडिया ' वरून उड्या टाकून जीव दिला नाही. हे गेले तर दुसरे छप्पन्न तयार आहेत.

तात्या– गंगूताई, गंगूताई–

राजे–अग, छपन्न काय ? छप्पन्नशे तयार होतील. पण यांनी तुला नापसंत काय म्हणून करावं हाच मुळांत महत्त्वाचा मुद्दा आहे. पुण्याच्या वाडिया कॉलेजांत चांगली तू इंटरपर्यंत शिकलीस, खेळांत आणि नाटकांत तुला आजपर्यन्त एवढी बक्षिसें मिळालीं, तशी दिसायला तूं अगदीच कांही ' ही ' नाहींस—मग या पंडितरावांनीं तुझ्यांत काय उणं पाहिलं हें मला समजावून घ्यायचं आहे.

मन्या–( तात्याकडे पाहून दबलेल्या आवाजात ) तात्या, तात्या अहो हें सार तुम्ही आधीं कां नाहीं सांगितलंत ?

तात्या–तूं मला बोलूं देशील तर ना ? सारखीं आल्यापासून तुझी बडबड चालली होती. आणि कांरे अकलेल्या कांद्या, या गोष्टी तूं तिला प्रत्यक्षपणें कां नाहीं विचारल्यास ? मग तिच्याशीं अर्धा तास बोलत बसला होतास तें काय रामायण आणि महाभारत यांच्यावर चर्चा केलीस कीं काय ?

मन्या–अहो, पण तिनं—

राजे–( तात्यांना ) कां हो काय म्हणत आहेत ते ?

तात्या–( मोठ्यानं ) नाहीं–तो म्हणतोय् कीं चुकलंच आपलं !

राजे–चुकलं ना ? आतां चुकायचंच ! गंगे. मी तुला पुन्हां एकदां विचारतो–यांनीं नकार दिला म्हणून तुला वाईट वाटलं नाहीं ना.

गंगू–( हंसून ) छे छे ! अहो मुळींच नाहीं.

राजे–मग ठीक आहे. बरं आहे पाहुणे–जाऊं शकतां तुम्ही ! तात्या यांना पोंचवून या टेशनावर !

मन्या–( अजीजीन ) अहो मी आतां तुमच्या अर्जाचा पुन्हां एकदां विचार करायला तयार आहे.

राजे– आमच्या अर्जाचा ? अरे, आतां तूंच अर्ज कर ! तुझ्याकडून आतां अर्जाचा गठ्ठा आला तरी आम्ही तो चुलींत घालून जाळून टाकूं. आमची पोरगी कांही अशी वाटेवर पडली नाहीं.

मन्या– माफ करा राजेसाहेब–फार मोठी चूक झाली माझ्या हातून !

राजे- आतां राजेसाहेब म्हणतो आहेस ! काय रे मी ' इस्पिक 'चा राजा काय ? आणि हे ' किलवर 'चे कारभारी काय ? अरे चौकटच्या गुलामा, आतां ही बदामची राणी तुला कशी मिळते तें पहातोंच मी !

तात्या– जाऊं द्या ना राजेसाहेब ! अहो, या वेडपटाचं एवढं काय मनावर घेतां ?

राजे– मनावर घेतां ? आणि हे वेडपट ? चांगलं वेड आहे यांचं ? छे छे ! कारभारी हा फार विद्वान मनुष्य आहे, जाऊं द्या याला. एवढं मोठं स्थळ झेपायचं नाहीं आपल्याला ! यांना ते काय ' ये ' पासून ' येम् ' पर्यंत गूण असलेली मुलगी हवी आहे. आमच्या मुलीजवळ फक्त ' क ' पासून ' घ ' पर्यंतच गूण आहेत.

गंगू– म्हणजे काय पपा ?

राजे– अग, ' क ' म्हणजे कजागपणा, ' ख ' म्हणजे खट्याळपणा ' ग ' म्हणजे गर्विष्ठपणा आणि ' घ ' म्हणजे घमेंडखोरपणा ! तेव्हां असल्या ' क ' पासून ' घ ' पर्यंत गूण असलेल्या मुलीला कुणीतरी ' ढ ' नवराच पाहिला पाहिजे.

तात्या–अहो मग हा आहेच कीं ! महाराज, त्याची चूक झाली असं म्हणतोय तो ! तेव्हां त्याला उदार अंतःकरणानं क्षमा करणं हेंच आपल्याला साजेसं आहे.

राजे–कारभारी त्या क्षमेचं आणि माफीचं नांवच घऊं नका. यांनीं आमच्या घरांत येऊन आमचा अपमान केला आहे. आतां मी यांचा अपमान करण्यापूर्वी याना सरळ स्टेशनावर पोंचवून द्या.

तात्या–नाही पण महाराज—

राजे–' नाहीं ' नाहीं अन् काहीं नाहीं. एकदां बोलणं तें बोललों. कारभारी, हे तुमचे भाचे आहेत म्हणून–आणि तुम्ही याची माझ्यासमोर फार मोठी तारीफ केली होती म्हणून–मी होकार द्यायला तयार झालों होतों. पण यानां मुलगी पसंत नाहीं तर यांच्यावर जुलूम कशाला ?

मन्या–अहो पण ' पसंत नाहीं ' असं म्हटल्याला बराच वेळ झालाय्. त्यानंतर तर पुष्कळच बदल झालाय् माझ्यांत !

राजे–मग ही अक्कल आधीच का सुचली नाहीं ?

तात्या–नाही, पण महाराज याबाबतीत एकदां गंगूताईचं मत तरी विचारून पहा.

राजे–काय ग गंगे—तुझं मत काय आहे ?

गंगू–' मत ' म्हणजे ' ओपिनियन ' होय ? म्हणजे मी यांच्याविषयीं काय ' ओपिनियन फॉर्म ' केलं आहे असं विचारतां आहांत होय तुम्ही ? तसे हे काहीं फारसे वाईट नाहींत पण ! वुईल डू !

राजे– विल्डू म्हणजे काय ?

तात्या– ' वुईल डू ' म्हणजे हा चालण्यासारखा आहे त्यांना !

राजे– गंगे–गंगे तूंच बोलते आहेस हें ? तुला हा चालण्यासारखा आहे ? अग, तुझ्याविषयीं हा काय काय वाईट बोलला याची तुला कल्पना तरी आहे कां ? यानं तुला अडाणी म्हटलं, मूर्ख म्हटलं–आणि तें इंग्रजींत काय काय म्हटलं तें तर मला कळलं देखील नाहीं. (गंगू मोठ्यानें हंसूं लागते.)

गंगू– अहो त्यांचं बरोबर आहे पपा ! त्यांनीं म्हटलं नसतं तर आश्चर्य !

राजे– आ ! म्हणजे काय बोलते आहेस काय तूं ?

गंगू– पपा, अहो मघाशीं मी यांच्यासमोर आले होते ना ? ती अगदी

वेगळ्या पोषाखांत आणि वेगळया स्वरूपांत ! यंदाच्या आमच्या गॅदरिंगच्या नाटकांत मी एका खेडवळ मुलीचा पार्ट घेणार आहे. म्हटलं–आज अनायासें संधी आहे तर त्याची रिहर्सल घेऊन टाकावी. (मन्याला) काय हो–कसं काय वाटलं तुम्हाला माझं नाटक ?

मन्या–( निराशेनं ) अहो, तुमचं नाटक झालं–पण आमच्या आयुष्याची सर्कस होण्याची वेळ आली आहे.

राजे–अग लबाडे ! तरी मी म्हटलं कीं हे ज्या वेळेला तुला पहातील त्यावेळीं मी आणि कारभारी दोघांनींहि तिथं नसावं असा हट्ट तूं कां धरला होतास ? आतां सगळया प्रकारचा उलगडा झाला. छान ! पुण्याला कॉलेजात शिकायला ठेवली तिथें हे चांगले उद्योग शिकलीस तूं ! तरी म्हटल तुला नाटकात भारंभर बक्षिसं कशीं मिळालीं ? बरं–पण काय ग ? हे तुला खरंच पसंत आहे ना ? का तेंहि नाटकच करते आहेस तूं ?

गगू ( हसून ) पपा, नाटक मधाशींच संपलं. मला यांच्यातल्या इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षा एक गोष्ट आवडली. आणि ती म्हणजे केवळ इस्टेटीच्या लोभानं हे ' त्या ' गंगूशीं लग्न करायला तयार झाले नाहीत ! याच्यांतला मनमोकळेपणा आणि प्रामाणिकपणाच मला अधिक आवडला.

राजे–छान आणि तूं हें मला आता सांगते आहेस ? मी त्यांना सात आठ शिव्या दिल्यानंतर ?

मन्या– जाऊ द्या हो, तसं कांहीं मी तुमचं बोलणं फारसं मनावर नाही घेतलं.

राजे–काय हो तात्या तुमचं काय मत आहे ?

तात्या– महाराज, ' मियां बिबी राजी तो क्या करेगा काजी ? ' मी तुम्हाला सांगितलं होतं कीं आमचा मन्या गंगूताईला पसंत पडल्याखेरीज राहाणार नाहीं.

राजे– मग काय- ठरवून टाकायचं म्हणतां ?

तात्या– तें आतां एकदां गंगूताईनांच विचारून टाकूं या–काय गंगूताई–या चौकटच्या गुलामाला जन्मभर तुमचा गुलाम करून टाकायला तुमची संमती आहेना ?

गंगू– इश्श !

राजे– (आश्चर्यानें) इश्श ? म्हणजे अजून हा शब्द शिल्लक ठवला आहे वाटतं तुम्ही ?

तात्या– असूं द्या महाराज (गंगू आणि मन्याकडे हात दाखवीत) आतां हें इश्श' आणि 'अय्या' च प्रकरण इथेंच राहूं द्या. आपण आतां पुढल्या गोष्टीचा विचार करूं या !

राजे - बर बरं ! चला ! ( दोघेहि आत जातात. )

मन्या - (गंगूला हात जोडीत ) खूप कलात आमची ! तुमच नाटकांतलं काम ' ए वन् ' होईल यात शंकाच नाही पण त्याची माझ्यावर जी रंगीत तालीम केलीत त्यामुळ आमच तोंड चांगलच रंगायची वेळ आली होती.

गंगू–त्या बाबतीत तुम्हांला जो त्रास झाला त्याबद्दल मी तुमची मनापासून क्षमा मागते ह !

मन्या- अहो कसली क्षमा आणि कसल काय घेऊन बसलात ? एवढी गमत चालायचीच !

रंग्या–( आतून प्रवेश करीत ) चांगली गमत केल्याती पाहुने ! सकाळच्या पारीं आलांत अन् घटघा भरात लगीन ठरवून मोकळे ? अवं माझं लगीन जमायला तीन वर्स लागली व्हतीं. अन् यवढहि करून मिळाल ते तसलं स्वांग ! पन तुमी मानर अशी पजाब मेलवानी काम उरकलंन हा ! आमच्या गंगूबाईना–

मन्या–हा हा रंगराव–आता ते नाव घेऊ नकोस हा ! ते नांव ताबडतोब बदलून टाकायचं ठरवल आहे मी ! त्या नावानंच सारा घोटाळा केला !

गंगू–कुठलं नांव ठेवणार हो तुम्ही माझं ?

मन्या–ते इतक्या तडकाफडकी ठरविता येणार नाही. त्याला सगळ्या राजकन्यांचीं नांवं एकदा शोधून काढली पाहिजेत. आपण दोघं मिळून करूं या तें काम ?

( बाहेर कोंबडा आरवतो )

**मन्था–** कायरे रगराव, तुमच्या या गांवांत कोंबडा भलत्याच वेळीं आरवतो वाटत ?

**रगराव–** ( अर्थपूर्ण हंसून ) भलत्या येळीं काय म्हणून ! अगदीं बरा ब्बर ऐन येळेला आरवतो त्यो ! अवं–त्यो तुमालाच म्हनतुया, कुकूच-कू ऽऽ ! राजाची लेक माजी बा ऽ यकू ऽऽ ! (तिघेही जण हसतात पडदा पडतो. )

* * *



